# नवभारत

वर्ष ४ थें ] नोव्हेंबर १९५० [ अंक २ रा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# या अंकांतील जाहिराती



अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर १९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकारितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

# ' नवभारत ', नोव्हेंबर १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**श्री. शं. बा. जोशी**—( धारवाड )—कानडी भाषेचे व कर्नाटक आणि महाराष्ट्र-संस्कृतीचे अभ्यासू पंडित. त्यांचीं कानडीमध्यें १२ पुस्तकें प्रसिद्ध झालीं असून त्यांपैकीं कांहीं बी. ए. व एम्. ए. च्या परीक्षांकरितां नेमलेलीं आहेत.

**श्री. विठ्ठलराव घाटे**—बी. ए., बी. टी., टी. डी. ( लंडन )—महाराष्ट्रांतील प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ, आणि साहित्यिक. 'रविकिरण मंडळा'चे सदस्य. माधव ज्युलिअन यांच्या सहकार्यानें काढलेला ' मधुमाधव ' हा कवितासंग्रह, ' कांहीं म्हातारे आणि एक म्हातारी ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. दि. के. बेडेकर**—( पुणें )—' सोव्हिएट राष्ट्रें व लोक ', ' संयुक्त महाराष्ट्र ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री माधव मनोहर**—( मुंबई )—व्यवसाय : अध्यापन. ' ज्वाला ', ' अन्नदाता ', ' एक आणि दोन ' या कथांचे आणि ' आई ', ' सशाचीं शिंगें ' या नाटकांचे लेखक.

**प्रा. द. रा. बेन्द्रे**— सोलापूर येथील डी. ए. व्ही. कॉलेजमध्यें कानडीचे प्राध्यापक. कानडी भाषेंतील अग्रगण्य कवि व समीक्षक.

**श्री. व. ह. पिटके**—( कोल्हापूर )—यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रकाशित होत असतात.

**विंदा ( प्रा. गो. वि. ) करंदीकर**—कागल ( कोल्हापूर ) येथील ' गोपाळ कृष्ण गोखले कॉलेज'मध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. ' स्वेदगंगा ' या कवितासंग्रहाचे लेखक.

**श्री. वसंत मोहरील**—नागपूर येथील सायन्स कॉलेजचे बी. एस्‌सी. चे विद्यार्थी. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रकाशित होत असतात.

**श्री. ह. कृं. मोहनी**—( नागपूर )—' तेजस्वी शिक्षण ' ' आमचा सनातन धर्म ' इत्यादि पुस्तकांचे लेखक. ' नवभारता ' चे एक संपादक.

**प्रा. न. र. फाटक**— मुंबईच्या रुइया कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' न्या. रानडे यांचें चरित्र ' ' ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी', ' एकनाथ : व्यक्ति व वाङ्मय ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. बा. ग. जगताप**—बी. ए., बी. टी.( पुणें )—महाराष्ट्रांतील प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. ' शिवाजी हायस्कूल ' चे संस्थापक. गेलीं ९ वर्षे प्राथमिक शिक्षण प्रांतिक कमिटीचे सभासद. १९४७ पासून महाराष्ट्र समाज-शिक्षण-समितीचे अध्यक्ष. ' अध्यापनाचा परिचय ', ' शाळा कशी चालवावी ? ', ' टॉलस्टॉयच्या आठ गोष्टी ', ' भारतीय शिक्षणाचा इतिहास ', इत्यादि पुस्तकांचे लेखक. गेलीं २९ वर्षें ' शिक्षक ' मासिकाचे संपादक.

**श्री. के. नारायण काळे**—बी. ए., एलएल्. बी.—( पुणें ) प्रसिद्ध साहित्यिक, संपादक, पटकथा-लेखक, नाट्य-चित्रपट-दिग्दर्शक. ' सहकार-मंजरी ' ( १९३२ ) या कविता-संग्रहाचे लेखक.

**श्री. गणेश दामोदर कुडे**—अमळनेर येथील प्रताप कॉलेजमध्यें बी. ए. चे विद्यार्थी.

---

अनुक्रमणिका

श्री. शं. बा. जोशी

# ग्रामनामें आणि समाजेतिहास

मानवेतिहास जाणण्याचीं पुष्कळ साधनें आहेत. त्यांत ग्रामनामांचा अभ्यास हें एक साधन आहे. कोणत्याहि साधनाकडून होऊं शकणाऱ्या साहाय्याला कांहीं एक मर्यादा असते. त्या मर्यादेपलीकडे तें साधन गैरलागूं ठरून निरुपयोगी होतें. इतकेंच नव्हे, तर त्यामुळें, आपण जें सत्य जाणूं इच्छितों, त्यापासून दूर आडमार्गांत जाण्याची भीति आहे. ग्रामनामांच्या अभ्यासांत तर ही भीति अजून विशेष आहे. या साधनाचा उपयोग करतेवेळीं दिशाभूल होऊं नये म्हणून जितकी काळजी घेतां येईल तितकें हितावह आहे. शक्य ती दक्षता बाळगूनहि नकळत कांहीं उणीवा या राहतातच. पण त्यांचीहि योग्य छाननी व्हावी व जास्तींत जास्त सत्य जाणतां आलें तर जाणावें या हेतूनें वरील एका लहानशा मुद्द्यावर तज्ज्ञ विद्वानांपुढें चर्चेकरितां माझे कांहीं अल्प विचार मांडूं इच्छितों.

## गांवांच्या नांवामागील जुना इतिहास

अतिपरिचयामुळें पुष्कळ गोष्टींतील अर्थस्वारस्य बरेचसें कमी होतें म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. याला अतिशय जवळचेंच उदाहरण म्हणजे आपल्या गांवांचीं नांवेंच घ्या. आपण राहात असलेल्या गांवाला मिळालेलें विशिष्ट नांव कां प्राप्त झालें, हें निश्चितपणें सांगणें आज जवळ जवळ अशक्य झालें आहे. याचें कारण काय ? तर आपण पिढ्यान्‌पिढ्या तिकडे दुर्लक्ष करीत आलों, हेंच नव्हे का ? ग्रामनामांच्या योगें आपणांस किती तरी जुना इतिहास कळूं शकतो, याची जाणीव फारच थोड्यांना आहे. आपल्या देशांतील पुष्कळ विचारवंतांचें लक्ष अजून इकडे पुरेसें वेधलें गेलें नाहीं, यावरून हेंच सिद्ध होत आहे.

एकेक गांव घेऊन त्याला तें नांव कसें रूढ झालें याचा शोध घेत जाणें ही एक पद्धत झाली. पण तुलनात्मक अभ्यासाचा प्रकार याहून थोडा निराळा आहे. एकेका विशिष्ट प्रदेशांतील शक्य तों एकूण एक गांवांची यादी करावयाची; त्यांच्या नांवाचे जुने सर्व फेरफार जाणावयाचे. अशा रीतीनें नांवें जमवीत असतां त्यांत आपणांस आपोआप कांहीं गट पडत असलेले दिसून येतात. उदाहरणार्थ, ग्रामनामांतील पूर्व-भागावरून त्यांत २० ते २५ गट होतील. पौराणिक प्रसंगावरून, देवादिकांवरून, ऐतिहासिक प्रसंग व व्यक्ती यांवरून, ग्रहनक्षत्रांवरून, वारांच्या नांवांवरून, संख्यांवरून, दिशांवरून, वृक्षवनस्पतींवरून, कृमिकीटकांवरून, गुरांढोरांवरून, पशुपक्ष्यांवरून, उंचसखल वगैरे भौगोलिक परिस्थितीवरून, लोकजातींवरून, व्यवहारोद्योगादिकांवरून वगैरे ग्रामनामांचे विविध गट होतात.

या एकेका विभागांत येणाऱ्या गांवांच्या नांवांवरून बरीच सूक्ष्म अशी नवी माहिती नजरेस येते. एकेका गांवाचें नांव सुटें घेतलें असतां कांहींचा अर्थबोधच होत नसतो. पण गटांत त्याचा अर्थ चटकन् लक्षांत येतो. भाषेंतील शब्दांचीं जुनीं रूपें कळतात. नानातऱ्हांच्या अपूर्व झाडाझुडपांची माहिती मिळते. एके काळीं कोणत्या देवता लोकप्रिय होत्या हें समजतें. गतकालीन प्रभावी महाभाग, ऋषी, मुनी, योगी, संत, महंत, सिद्ध, सत्पुरुष

किंवा राजकारणी महाव्यक्ती यांचें अजरामर स्मारकच जणूं, अशीं पुष्कळ गांवांचीं नांवें काल-प्रवाहासहि दाद न देतां तगून उभीं असलेलीं दिसतात. कांहीं गांवांच्या नांवांवरून त्यांच्या पंचक्रोशींतील खनिज संपत्ति आदींची सूचना मिळते. अशा प्रकारच्या सूचनेवरूनच भद्रावती-( म्हैसूर ) जवळील लोखंडाच्या कारखान्याला आरंभ झाला. असो. या लेखांत ग्रामनामांच्या पूर्व-भागाचें विवरण प्रस्तुत नाहीं. म्हणून याचा विस्तार येथें इष्ट नाहीं.

कोणतेंहि ग्रामनाम घेतलें तरी सामान्यपणें त्यांत दोन शब्द आढळतात. पण कांहीं ठिकाणीं पूर्व-भागाइतका उत्तर-भाग स्पष्ट नसतो. नित्य व्यवहारांतील बोलींत तो बराच संक्षिप्त झालेला दिसतो. नाग+पुर, सिंद+खेड, केंद+ऊर अशा ठिकाणीं जी स्पष्टता आहे, ती जुन्नर, खोपवली वगैरे ग्रामनामांत नाहीं. त्या ठिकाणीं जुने+नगर, खोप+पल्लि अशा स्पष्टीकरणाची आवश्यकता भासते. नाशिक, नगर, पाटण वगैरे कांहीं गांवांच्या नांवांत उत्तरपद रूढ नसतें. तरी तशा नांवांपुढें शहर, गांव, खेडें असें कांहीं एक ग्रामवाचक उत्तरपद जोडण्याचा प्रघात आहेच. वर सांगितल्याप्रमाणें पूर्व-भाग विवरणात्मक असतो. उत्तर-भाग स्थान, तीर किंवा प्रदेश यांचा वाचक असतो.

मंगळवाड, गणेशवाडि, उदयगिरि, सिंहगड, विंचूर, चाळिसगांव, नागपाडा, घोडनदी इत्यादि उत्तर-भागांतील गड, गिरि, नदी, होळ, खोरें, बळ वगैरे तऱ्हेचीं नांवें वगळलीं तर बाकीचीं पुर, गांव, वाड, वाडि, हाट अशीं स्थान किंवा प्रदेश या अर्थाचींच नांवें राहतात.

शब्दाच्या उत्तर-भागावरून वसति-स्थानाची कांहीं कल्पना येऊं शकते. तळें, नदी, खोरें, गड अशा नांवांवरून त्या गांवाच्या भौगोलिक परिस्थितीची अटकळ करतां येते. खेडें, खोप, वाडि, नगर, पुर यांसारख्या शब्दांवरून तें गांव छोटें आहे किंवा मोठें आहे असा कांहींसा तर्क करण्यास जागा आहे. तसेंच आपल्या वसाहतीला कोणत्या तऱ्हेनें आरंभ झाला व त्याची वाढ कशी होत गेली, हें पाडा, पाडि, वाडा, वाडि...हाट या वर्गातील ग्रामवाचक शब्दांवरून बरेचसें कळून येतें असें मला वाटतें. पाडा–वाडा–हाट या वर्गातील ग्रामनामांची या दृष्टीनें अजून कोणी चिकित्सा केलेली नाहीं. तिचा हा प्रथमच आरंभ आहे. या लेखांत व्यक्त केलेल्या विचारांत कांहीं तथ्यांश आहे असें ठरेल तर आपल्या प्रागैतिहासिक, अत्यंत महत्त्वाच्या पण आजपर्यंत संदिग्ध असणाऱ्या कांहीं गोष्टींचा सुगम रीतीनें उलगडा होणार आहे.

## 'पट्टि'–'पाडि' ची व्युत्पत्ति

'पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा...हट्टि, हाट, हाडि...' हे या वर्गातील मुख्य शब्द आहेत. याचा सामान्य आराखडा पुढें देणार आहे. पण प्रथम हे शब्द स्वतंत्र आहेत किंवा एकाच मूळ धातूपासून निष्पन्न झालेलीं विविध रूपें होत हें स्पष्ट करून घेणें जरूर आहे.

'पाडगांव' सारखे कांहीं अपवाद सोडले तर 'पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा...हट्टि, हाट' हे शब्द साधारणपणें ग्रामनामांच्या शेवटीं आढळतात; तेथें सर्वत्र 'स्थळ', 'जागा', 'प्रदेश' असाच मुख्यार्थ आढळतो. उदाहरणार्थ— कडपट्टि (जमखिंडीजवळचें खेडें), कोंकणपट्टि (प्रदेश), गोपाडि (मंगळूरकडील खेडें), ताळेपाडि, नागपाडा, कुरडुवाडि, मऱ्हाटवाडा, हाटवटी, शिरहट्टि, हाडि (ग्राम) वगैरे. या वरील उदाहरणांतील 'पट्टि, पाडि, पाडा' यांना एक अर्थ, 'वाडि, वाडा' यांना दुसरा अर्थ व 'हट्टि, हाट' यांना तिसराच अर्थ संभवत नाहीं. सर्वांत स्थलवाचक अर्थच पुरेपूर भरला आहे. यामुळें हे सर्व शब्द सामान्यपणें सन्मानार्थी आहेत, असें म्हणावें लागतें.

'पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा...हट्टि, हाट' यांत अर्थसादृश्याप्रमाणें रूपसादृश्यहि आहे असें माझें मत आहे. 'पाडि' आणि 'पाडा' हे भिन्न शब्द मानण्याची जरूरी नाहीं. वाडि, वाडा, वाड व वड हीं भिन्न म्हणतां येणार नाहींत. नित्य व्यवहारांतील उच्चारांत किंचित् फरक पडत जाऊन अंत्य इकारांमध्यें बदल होत होत 'वाडि'चें वाडा, वाड, वड असें रूपांतर होत गेलेलें दिसून येतें. कर्नाटक, तेलंगण, तामिळ या देशांत पट्टि, पाडि व पाडु हे शब्द जितक्या प्रमाणांत आहेत, तितके ते

उत्तरेकडे आले असतां कमी प्रमाणांत दिसून येतात. संस्कृतोद्भव बोलींत शब्दान्त्य उ, इ पेक्षां अ ( किंवा आ ) कडे जास्त कल दिसतो. 'हालु' शब्द हाला किंवा हाल या स्वरूपांत बदललेला आढळेल. 'ऊरु' चे 'ऊर' किंवा 'ऊरा' असें होतें ( उदाहरणार्थ, केंदूर, बंकूरा ). याप्रमाणेंच 'पाडि, पाडा' हीं 'पाडु' चींच भिन्न रूपें मानणें जरूर होतें. तसेंच वाडा, वाड किंवा वड हे शब्द 'वाडि' चींच निराळीं रूपें होत. पट्टि आणि पाडि ( पाडु ) हे शब्द मुळांत 'पडु' या धातूचीं साधित रूपें आहेत, असें सर्व द्राविडवर्गीय भाषा-कोविदांचें मत आहे.

आतां मुख्य प्रश्न राहतो तो हा कीं, 'वाडि' ( वाडा ) हा स्वतंत्र शब्द आहे कीं 'पाडि'-पासूनच तो निष्पन्न झाला ? संस्कृत व प्राकृत परंपरे-प्रमाणें वाटिकापासून 'वाटि–वाडि' झालें आहे. 'वाट' पासून 'वाड' झालें आहे; यांत वाटि आणि वाट हे निराळे शब्द मानण्याची जरूरी नसतां, तसे ते गृहीत धरले गेले आहेत ! आणि या शब्दां-च्या व्युत्पत्तीविषयीं संस्कृत विद्वानांतच मतैक्य दिसत नाहीं. वृत्त-वट्ट-वाट-वाड अशी व्युत्पत्ति कांहीं विद्वान् सुचवितात तर कांहीं वर्ति-वट्टि-वाट्टि-वाटि-वाडि असें गृहीत धरतात. आणखी कांहीं तर वटवृक्षाशीं 'वाटि-वाडि' चा संबंध जोडूं पाह-तात ! 'वाड' करितां "वृत्त" ची आवश्यकता भासली, वाडि पाहतांच "वर्ति" कडे धांव घ्यावी लागली, हें स्पष्ट आहे. मुळांत 'वाड' आणि 'वाडि' भिन्न समजल्यानें हा घोंटाळा झाला आहे.

"पाडि" पासून वाडि शब्द सिद्ध होतो हें लक्षांत घेतलें तर वरील सर्व यातायात चुकून घोंटाळे दूर होणार आहेत. 'प' काराचा 'व' कार होऊन 'पाडि' चा 'वाडि', 'पाडा' चा 'वाडा' झाला आहे. या तऱ्हेचे कांहीं जुने प्रयोग पाहिल्यावर याविषयीं शंकेला जागाच राहत नाहीं.

"सप्तार्ध लक्ष रट्टपाडि" चा उल्लेख जुन्या ताम्रपटांतून वगैरे मिळतो. रट्टपाडि म्हणजे रट्टांचा देश. 'पाडि'चा देश, प्रदेश असा अर्थ येथें सुस्पष्ट आहे. "रट्टपाडि" प्रमाणेंच गंगवाडि, सिंदवाडि, नोळंबवाडि, कन्नवाड वगैरे प्रयोग शिलालेख, ताम्र-पट वगैरेंमधून पुष्कळ आलेले आहेत. येथें रट्ट-पाडीप्रमाणेंच गंगपाडि, सिंदपाडि असें मूळ रूप असलें पाहिजे. संधि होतांना 'पाडि' चें 'वाडि' झालें आहे यांत शंका नाहीं.

हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणांत याला आधारहि पण आहे. "पो वः" ( ८. १. २३१ ) या सूत्रा-प्रमाणें 'पाडी'तील 'प'काराचा 'व'कार होऊं शकतो. "स्वरात् परस्य असंयुक्तस्य अनादेः परस्य प्रायो वा भवति ॥" असें त्या सूत्राचें विवरण दिलें आहे. यावरून गंगवाडि, नोळंबवाडि अशा उदाहरणांतील "वाडि"चे मूळ रूप 'पाडि'च आहे हें निःसंदिग्ध रीतीनें सिद्ध होत आहे. 'पाडि'चें वाडि ज्याप्रमाणें होतें, त्याचप्रमाणें पळ्ळि (-ळ्ळि ) चे वळ्ळि (-ळ्ळि ) झालेलीं उदाहरणेंहि पुष्कळ मिळतात. उदा०—तिळवळ्ळि, कासवलि इत्यादि.

प्राकृत व्याकरणाप्रमाणें कानडीचाहि याला पूर्ण पाठिंबा आहे. नागवर्मा यानें 'कर्णाटक-भाषा-भूषण'नामक ग्रंथांत कानडी व्याकरणसूत्रें संस्कृत भाषेंत रचलीं आहेत ( इ. स. ११४५ ). याचाच 'काव्यावलोकन' हा दुसरा ग्रंथ आहे. त्यांत 'शब्द-स्मृति' विभागांत व्याकरणविचार येतो. या दोन्हींत अनुक्रमें ३१ व १२ या सूत्रांत 'प' काराचा 'व'-कार कोठें संभवतो हें सांगितलें आहे. केशिराजानें 'शब्द–मणि–दर्पण' नांवाचा व्याकरणग्रंथ लिहिला आहे ( इ. सं. १२६० ). त्यानें आपल्या ग्रंथाच्या ६७ व्या श्लोकांत हाच नियम दिला आहे. भट्टाकलंकदेवानें ( इ. स. १६०४ ) संस्कृत भाषेंत, कानडी प्रौढ व्याकरण लिहिलें आहे. ५९२ सूत्रें देऊन त्यांवर 'भाषामंजरी' नामक वृत्ति व 'मंजरी-मकरंद' नामक व्याख्यान लिहिलें आहे. यांतील ९१ व ९२ सूत्रांत 'प' काराचा 'व'-कार होण्याचा नियम दिला आहे.

समासांत व वाक्यांत 'प', 'ब', 'म' यांचा 'व'-कार होतो, ही प्रथा कानडींत अति-प्राचीन आहे. प्राकृतांतहि असाच नियम दिसून येतो. कानडी आणि प्राकृत यांतील या वैशिष्ट्यांचें गमक लक्षांत न आल्यानें मराठींतील कांहीं कोडीं न सुटतां आजपर्यंत तीं जशींच्या तशींच राहिलीं

आहेत. 'वाडि,' 'वाड' यांचीच व्युत्पत्ति केवळ नव्हे, 'वऱ्हाड' शब्दाचा सुद्धां उलगडा न होतां, आजपर्यंतचे सर्व तर्कवितर्क आडमार्गात नेण्यास कारणीभूत झाले आहेत. प्राकृतांत "मन्मथ" 'वम्मह' होतो, तसें याच नियमानुसार 'मऱ्हाट'चा 'वऱ्हाट' झालें असणें साहजिक आहे. असो. एकूण 'पट्टि, पाडि, पाडा', 'वाडि, वाडा', 'हट्टि, हाट, हाडि' यांतील पट्टि, पाडि, पाडा व वाडि हे शब्द स्वतंत्र नाहींत, 'पट्टि-पाडि'चीं हीं सर्व निराळीं रूपें आहेत असेंच ठरतें. आतां 'हट्टि, हाट'चा प्रश्न. हट्टि आणि हट्ट, हे निरनिराळे शब्द समजण्याची जरूरी नाहीं. कारण 'वाडि, वाडा, वाड' प्रमाणेंच उच्चारांतील अस्पष्टपणामुळें हे प्रकार निर्माण झाले आहेत, हे 'वाडि, वाडा, वाड' यांविषयीं विवरण करते वेळीं वर सांगितलेंच आहे. हट्टि व हट्ट हे शब्द संस्कृतांतून मराठींत आले अशी बऱ्याच विद्वानांची समजूत आहे. आणि संस्कृत 'हट्' (प्रकाशणें) धातूपासून याची व्युत्पत्ति सांगितली जाते. पण 'हट्टि' हा शब्द संस्कृत नाहीं असें मला वाटतें. हेमचंद्राच्या '-देशीनाममाले'त 'हट्टि ग्रहभेदे च'; 'ग्रामेऊरु :;' असें दिलेलें आढळतें. 'ऊरु' (ग्राम) या प्रमाणेंच 'हट्टि' शब्द संस्कृत नसून 'देशी' आहे, असें हेमचंद्रासारख्या संस्कृत व प्राकृत उभयभाषाविशारदाचें मत आहे.

'हट्टि' हा देशीय शब्द असें ठरल्यास त्याची व्युपत्ति सरळ लक्षांत येण्यायोगी आहे. जुन्या कानडींत 'ह' कार नाहीं. संस्कृत भाषेच्या संपर्कानें कानडी भाषेवर जे कांहीं बरेच दूरगामी परिणाम झाले आहेत, त्यांत 'प'-काराचा 'ह' कार होणें, हा एक महत्त्वाचा परिणाम आहे. 'प'काराचा 'ह'कार होण्यामुळेंच पालु–हालु, पुलि–हुलि, पिट्ठ–हिट्टु, पर्व–हब्बसारखे शब्द नव्या कानडींत अस्तित्वांत आले. या नियमानुसार पट्टि–हट्टि, पाडि–हाडि, हे शब्द तयार झाले आहेत असेंच सर्व जुन्या व नव्या कन्नडपंडितांचें मत आहे.

यावरून (१) पट्टि पाडि, पाडा...(२) वाडि, वाडा...(३) हट्टि, हाट, हाडि हे भिन्नभिन्न शब्द नसून तीं उच्चारभेदामुळें रूढींत आलेलीं एकाच शब्दाचीं विविध रूपें आहेत, असें म्हणावें लागतें.

'पट्टि–पाडि'ची व्युत्पत्ति निश्चित ठरल्याशिवाय पुढील विचाराला चांगली बळकटी येणें शक्य नाहीं. याकरितां या किचकट चर्चेत शिरल्याविना गत्यंतर नव्हतें. 'पट्टि–पाडि' या वर्गातील पाडि, वाडि, हट्टि वगैरे हे शब्द "पट्ट" धातूपासून निघाले असें ठरलें तर, बऱ्याच गुंतागुंती आपोआप सुटतात.

विद्वानांना मराठी भाषेंतील 'पाडि' शब्दाच्या अर्थाचा थांग लागल्याचें अजून दिसत नाहीं, महाराष्ट्र-शब्दकोशांत या शब्दाचा "पहाडा"शीं संबंध जोडला आहे! अलीकडील प्रा. कुलकर्णींच्या व्युत्पत्तिकोशांतही हाच प्रकार दिसतो. 'पाडि' शब्द, महानुभाव भास्करकवीनें व श्रीज्ञानेश्वरांनीं उपयोजिला आहे. 'कैवल्याची पाडि' हा महानुभाव भास्करकवीचा प्रयोग आहे. 'सद्वासनेचिया पाडि आला' असें ज्ञानेश्वर लिहितात (७.१२६). पहिल्या उदाहरणांतील 'कैवल्य' म्हणजे (कैलास) 'पर्वत' असा भ्रम उत्पन्न झाला असावा. पण दुसऱ्या अवतरणांत तशा शंकेला बिलकूल जागा नाहीं. शिवाय 'रट्ट पाडि' वगैरेमध्यें पाडि शब्दाचीं, केवळ प्रदेश किंवा स्थान या अर्थाचीं, बरींच उदाहरणें यापूर्वीं दिलींच आहेत. यावरून 'पाडि'चा संबंध पहाडाशीं नेऊन भिडविण्याचीं आवश्यकताच राहत नाहीं.

याचप्रमाणें 'पाडा' शब्दाच्या सिद्धिक्रमाविषयीं गैरसमज आहेत. संस्कृतांतील 'पद्र (-क)' शब्दापासून 'पाडा' शब्द निष्पन्न झाला असा समज आहे. पण 'पद्र' शब्दाचें बूडच आधीं संस्कृतांत स्थिर नाहीं! 'पद्र– a village' असा अर्थ देऊन, मोनिअर विलियम्सनें त्यापुढें L अशी खूण घातली आहे. 'L' या संकेताचा अर्थ त्यानें दिला आहे तो असा: 'L.—Lexicographers, (i.e.) a word or meaning which although given in native lexicons, has not yet been met with in any published text.' बेन्फेच्या (मॅक्स मुलरनीं संपादिलेल्या) कोशांत हा शब्द घेतलेला नाहीं. संस्कृतां-

तील आधार म्हणून गणलेल्या मूळ 'पट्ट' शब्दालाच जर या भाषेंत स्थान नसेल तर पुढें 'पाडा'चा काय पाड ? संस्कृत साहित्यांत ज्या शब्दाला जागा नाहीं त्याला संस्कृत म्हणण्यापेक्षां 'देश्य' शब्द म्हणणेंच जास्त समंजस होणार नाहीं का ? वास्तव 'पाडा (पाडि)' हा संस्कृतोत्पन्न शब्द नव्हे, पट्टि—पाडि—वाडि—हट्टि या वर्गांतीलच एक आहे, असें मला वाटतें.

पट्टि—पाडि 'पड्ड' धातूपासून निष्पन्न झाले आहेत. पडु धातूला पुढील अर्थ किट्टेलनें दिले आहेतः 'to lie down, to repose.' तामिळ कोशांत (Tamil Lexicon) 'to spread out, as bedding; to lay horizontally, to lie down, to sleep' असे बरेच अर्थ दिले आहेत. तेलगु, मल्याळमूमध्येंहि हेच अर्थ आहेत. किट्टेलनें "'पडु' (नाम) a place (hollow or hole) of refuge (for wild animals) between stones or rocks" असा अर्थ दिला आहे. 'पडु' धातूच्या 'निजणें' वगैरे अर्थानुसंधानांत 'पहुडणें' या मराठी धातूचें औचित्य चांगलेंच लक्षांत येण्याजोगें आहे. पहुडण्याची (वसतीची) जी जागा ती पट्टि किंवा पाडि, असा या शब्दांचा मुदलांतील अर्थ आहे.

पुढें लक्षणेनें या शब्दांनां बरेच अर्थ प्राप्त झाले आहेत. कालानुक्रमदर्शक शब्दकोश तयार होतांच शब्दांच्या अर्थामध्यें झालेल्या फरकांच्या मागें दडलेला बराच महत्त्वाचा इतिहास सुंदर रीतीनें बाहेर प्रकाशांत येणार आहे. शब्दांना लक्षणेनें प्रतीत होणारे नवनवीन अर्थ निष्कारण कधींच आलेले नसतात. काल-परिस्थितीच्या ओघांत शब्दांना अर्थ संभवतो. सामाजिक पार्श्वभूमींतील विविध घटनांची रंगीबेरंगी छाया तत्कालीन बोलींतील शब्दांच्या अर्थामध्यें सामावलेली आपणांस दिसून येते.

या दृष्टीनें पाहतां पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा,... हट्टि, हाट या शब्दांमध्यें व्यक्त होणारे निरनिराळे अर्थ देतेवेळीं, कोशकारांनीं, एखादा विशिष्ट क्रम पाळण्याची तसदी घेतलेली दिसत नाहीं. कालानुक्रमाचा विचार तर राहोच, मूळ अर्थ आधीं, नंतर लक्षणेनें येणारे दुसरे अर्थ, असा क्रम सुद्धां अनुसरलेला क्वचितच आढळतो. पट्टि, पाडि, पाडा,...वाडि, वाडा...हट्टि, हाट यांचे प्रत्येकीं एकापेक्षां अधिक अर्थ आहेत. त्यांत आधींचा कोणता व मागून आलेला कोणता याचा निर्णय कालानुक्रमयुक्त कोश तयार होईपर्यंत निश्चयात्मक रीतीनें होणें जरा कठीण आहे. तरी पण समाजशास्त्र आपणांस या बाबतींत कांहीं थोडें साहाय्य करूं शकतें. त्याच्या आधारें 'पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा,... हट्टि, हाट' यांच्या निरनिराळ्या अर्थांचा बराच उलगडा होऊं शकतो.

'पट्टि' शब्दाला किट्टेलनीं पुढील अर्थ दिले आहेतः 'A place of lying down, a pen or fold; an abode, a hamlet'. जुन्या कन्नड कोशांत या शब्दास 'आभीरपल्लि, घोष' असे अर्थ दिले आहेत. तामिळ कोशांत 'Cowstall, sheepfold, a measure of land sufficient for a sheepfold, cattle-pound, a hamlet, a village, a place' असे अर्थ आहेत. 'हट्टि'ला गोस्थानक, गुरेंढोरें बांधण्याची जागा, असा अर्थ नाचिराजीय नांवांच्या अमरकोशावरील एका जुन्या कानडी टीकेंत दिल्याचें किट्टेलनें नमूद केलें आहे. 'हट्टि' याचे झोंपडी, गोठा आणि लहान खेडें, असे अर्थ आजच्या कानडींत अजूनहि रूढ आहेत. वसुद्वादशीपासून आरंभ होणाऱ्या सणाला हट्टिहब्ब (गुरामेंढ्यांचा सण) असें नांव आहे. त्या वेळीं गाईबैलांची व मेंढ्यांची पूजा केली जात असे. गौळवाड्याचा म्हणजे 'हट्टि'चा हा सण; या मुळेंच 'हट्टिहब्ब' असें नांव प्राप्त झालें आहे.

यावरून पट्टि आणि हट्टि यांच्या अर्थांमधील साम्य चांगलेंच व्यक्त होतें.

पहुडण्याची जागा ती पाडि, पाडा किंवा पट्टि (हट्टि), वसतिस्थान, राहण्याची जागा असा मुख्य धात्वर्थ आहे. या मूळार्थाबरोबर गौळवाडा, धनगराचें बिऱ्हाड हा दुसरा अर्थ कां व कसा आला असावा ?

## पशुपालनवृत्तीपासून कृषीवलवृत्तीपर्यंत

मानव-विकास-क्रमाच्या सामान्यपणें चार अवस्था सांगितल्या जातात : १ आहारसंचयार्थ भटकणाऱ्या

पारध्यांची. २ पाळीव जनावरांची माहिती झाल्या-नंतर उदयास आलेल्या धनगरांची; ३. उपर्युक्त वनस्पतींची ओळख झाल्यावर त्यांची लागवड करण्यास आरंभ करणाऱ्या बागवान्-शेतकरी 'कुटुंबियां'ची. ४ शेतीपुढील क्रमप्राप्त व्यापारोद्योग व राजकारणी धंदेवाइकांची. या चार अवस्थां-पैकीं दुसऱ्या अवस्थेंतील जीवनांची सूचना 'पट्टि-हट्टि' मध्यें तर आहेच; शिवाय 'पाडा, पाडि' मध्येंहि तोच अर्थ ध्वनित होत आहे. "पाडम्" ला तामिळमध्यें Street, Street of herdsmen, 'इडैयर्‌चेरी',(गवळ्याची आळी) असे अर्थ,व पाडीला Town, City, Hamlet, Quarters, Pasrotal village, District' असे अर्थ आहेत.

कानडींत रट्टपाडि, गंगवाडि वगैरे शब्दांत 'पाडि'ला देश असा अर्थ व्यक्त होतो. खेडें या अर्थी 'पाडि' आणि 'हाडि' म्हैसूरमध्यें व दक्षिण-कन्नड जिल्ह्यांत आढळतात. तरीपण महाराष्ट्रांत 'पाडा' शब्दांत, वरील 'पट्टि (हट्टि)' चा अर्थ संपूर्णतया दिसून येतो. 'पाडा' म्हणजे 'शेतीच्या कामाच्या सोयीसाठीं शेतकऱ्यांनीं आपल्या गांवा-पासून किंचित् दूर व शेतीपासून जवळ बांधलेल्या झोपड्यांची वाडि; लहान खेडें' असा अर्थ 'महा-राष्ट्र-शब्दकोशां'त दिला आहे. जुन्या सांप्रदायिक माहितीनें भरलेल्या व त्यामुळें उपयुक्त आधार-ग्रंथाचें महत्त्व पावलेल्या 'गांवगाडा' या ग्रंथांत श्री. त्र्यं. ना. अत्रे यांनीं 'पाडा' चें विवरण दिलें आहे. तें असें : 'शेतांत एक दोन घरें अस-तील तर त्यांना झांप, अवसा, कोठा—गोठा किंवा पडाळ म्हणतात. आणि तीं दहा, पांच किंवा अधिक घरें असून त्यांचें छोटेखानीं गांवठाणच बनलें असलें तर त्याला वाडा, वाडि, मजरे, पाडा असें नांव प्राप्त होतें.'

वरील दोन्ही उताऱ्यांवरून पाडा, वाडा व वाडि हे समानार्थी शब्द आहेत याविषयीं शंका राहत नाहीं. पाडा छोटा असल्यास त्याला पाडळ अशी संज्ञा आहे, असें श्री. अत्रे लिहितात.

एकूण, पट्टि (हट्टि), पाडा यांत पशुपालन वृत्तीपासून शेतकरी—जीवनक्रमापर्यंतच्या स्थितीची अर्थसूचना आहे असें सिद्ध होतें.

वाट, वाटि(का) शब्दाला संस्कृतांत आढळणारा अर्थहि याला संपूर्ण पोषकच आहे : A site of a house, an enclosure, a garden, a park, an orchard, वाट. शब्दाच्या अशा या अर्था-बरोबर हरिवंशांतील (३३९७) 'गोवाट' चा प्रयोग पाहिला तर 'वाट'ला पट्टि—पाडिचें संपूर्ण अर्थ असलेले कबूल करावें लागतें.

'पट्टि—हट्टि' मधील अर्थाचें मर्म विसरून गेल्यानें मराठींतील 'हट्टिकार—धनगर' किंवा 'हटगार—धनगर' यांतील पदद्वयाची व्युत्पत्ति अजून कोणाच्या लक्षांत आल्याचें दिसत नाहीं. 'हटगार' याला हट्टी 'Obstinate' असा अर्थ कांहींनीं लावण्याचा प्रयत्न केला आहे. 'धनगर' म्हणजे धेनुकर असा तर्क लढविलेला पहावयास मिळतो. विल्सनचा हा तर्क पुढें कोणास मान्य झाला नाहीं, तरी धन—कर याचा अर्थ लागल्याचें दिसत नाहीं. या विषयींचा वैचारिक गोंधळ प्रा. कुलकर्ण्यांच्या व्युत्पत्तिकोशांत नमूद आहे. 'हट्टि-हब्ब'—हट्टीचा सण म्हणजे 'गाई—म्हैश्यांचा सण' हें मागें सांगितलें आहे. खानदेशच्या गॅझेटिअरमधील पुढील उतारा पहा : Kanadas (gavalis) are a peculiar race of drovers ...they have a peculiar breed of black and white cattle. HATKAR which, though not large, are much prized for their strength and spirit (p. 106). येथें "हटकार" ला गाई—बैल असा अर्थ स्पष्ट आहे. कानडींतील नाचिराजीय, मंगराजनिघंटु वगैरे जुन्या कोशांतून हट्टिकार म्हणजे गवळी असा अर्थ दिलेला आहे. 'हटिकार—धनगर' किंवा 'हटकार—धनगर' हें पद, एकाच अर्थाचे दोन शब्द मिळून झालेलें आहे. तांबडा-लाल, कागद—पत्र, ईड—लिंबू खेळ—आडु अशा तऱ्हेची ही जोडी आहे. यांना Translation Compounds असें डॉ. सुनीति-कुमार चटर्जींनीं नांव दिलें आहे. 'हट्टिकार' म्हणजेच धनगर. 'धन' ला येथें गो-धन असा अर्थ आहे. कानडींत 'दन' म्हणजे गाई—बैल.

'दन' हा शब्द 'धन' शब्दाचा तद्भव आहे, असें १२ व्या शतकाच्या पूर्वीपासून कानडींत मानण्यांत आलेलें आहे. यामुळें (गो) धन पाळणारा तो धनगर. अर्थात् 'हट्टिकार' तोच 'धनगर'. 'दनगार' (म्हणजे गुरें पाळणारा) हा शब्द आजही कानडी बोलींत रूढ आहे.

वरील सर्व गोष्टींवरून 'पट्टि–हट्टि'मध्यें गोपालन-वृत्तीपासून कृषीवलाच्या अवस्थेपर्यंतचा अर्थ प्रतीत होतो, हें निःसंशय आहे.

संस्कृतांत व मराठींत 'हाट' किंवा 'हट्ट' याला बाजार असा जो अर्थ आहे तो शेतकीच्या पुढील पायरीचा; पट्टि–पाट–पाटक–पेठ यांतील अर्थपरिवर्तनहि लक्षांत घेण्याजोगें आहे.

संस्कृतमध्यें 'गोप' शब्दाच्या अर्थविकासाची रीत पाहिली तर मराठींतील (गौळ-) वाड्याला विस्तीर्ण (राज) वाडा, वैभवशाली भव्य हवेली असा अर्थ कसा प्राप्त झाला असेल याची चांगली कल्पना येणार आहे. हें हटगारांच्या वाढत्या वैभवाचें निदर्शक आहे. पट्टि, पाडि, पाडा, वाडा यांना विस्तीर्ण प्रदेश, देश, राज्य असे अर्थ आले. (लहानशा) 'पट्टि'चें 'पट्टण' होऊन राजधानी असा अर्थ प्राप्त झाला. कालगतींत हट्टि, पाडि यांना ओसाड गांव असा अर्थहि आला असल्यास नवल नाहीं.

या हजारों वर्षांच्या कालावधींत 'पट्टि, हट्टि'चीं विविध रूपें लोकव्यवहारांत रूढ होणें अत्यंत साहजिक आहे. दक्षिणापथांतील (नर्मदा ते कावेरी) गांवांच्या नांवांची यादी पाहिली तर 'पट्टि–हट्टि' या वर्गांतील नाना रूपें स्वल्प उच्चार-भेदानें पहावयास मिळतील. पाडेगांव, पाटगांव, पारगांवसारख्या कांहीं ठिकाणीं हीं रूपें ग्रामनामांच्या पूर्वभागांत आढळलीं, तरी तीं बहुतेक उत्तर-भागांतच दृष्टीस पडतात. उच्चारानुरोधानें झालेल्या फरकांप्रमाणें त्यांचे गट करून त्याचा आराखडा येथें देत आहे :

पट्टि—हट्टि

पाडु—पाडि, पट्टि; पट्टण—पाटण—पाटणा;
पट्ट—पाट—पाटक; पट्टार;...पेठ; पेठा;
पाडु—पाडा—पारा.........

पारा—हारा, हार–हर;...आर...;
पाडु...आडु; पाडि...आडि;
पाडु—बाडु—बाड...
बाडु—बाळु—बाळ
बाडु—वाळु—वाळ—वळ...वल
पाडा—वाडा—वाड; वड; वाडे; वडिगे..
पट्टि—पाटि...
पाटि—वाटि; वाटिका
पट्टि—पाट
पाट—वाट; वाटक...वाढार (पाठार); वठार; वठाण...
पट्टि—पाटि—प्याटि;...पेटे, पेठ, पेठा;... पाठार; पाटक;
पट्टि—हट्टि; पट्ट—हट्ट; पाट—हाट;
पाटक—हाटक; पाडि—हाडि;...
पाडु—पाळु–हाळु–हाळ;...आळ; आल...
पट्टि... पल्लि... वल्लि... बळि... वलि...
ओलि...ळि; पल्लि—हल्लि
पाडि—पाळि—हाळि...हाळ
पाळि—पाळ्य, पल्य

'पट्टि—हट्टि'चा हा विविध पसारा लक्षांत आल्यास ऱ्याच गोष्टींवर नवीन प्रकाश पडणार आहे. 'हटगार—धनगर' हें उदाहरण वर आलेंच आहे. शिवाय या प्रकारचें आणखी एक उदाहरण म्हणजे 'अग्रहार' हें होय. 'अग्रहार' शब्दाची व्युत्पत्ति अजून निश्चित झाली नाहीं. खालील अवतरणांवरून ही गोष्ट पटेल.

(१) 'अग्रं ब्राह्मणभोजनं, तदर्थं ह्रियंते राजधनात् पृथक् क्रियंते ते क्षेत्रादयः।'

(२) 'अग्रं प्रथमं ह्रियते उत्पन्नशस्यात् उद्धृत्य स्थाप्यते।'

(३) 'अग्रं हरति।'

(४) 'क्षेत्रोत्पन्नशस्यात् उद्धृत्य ब्राह्मणोद्देशेन स्थाप्यं धान्यादि गुरुकुलादावृत्तब्रह्मचारिणे देयं क्षेत्रादि ग्रामेभ्यश्च।'

वरील उताऱ्यांवरून 'अग्र' आणि 'हार' या दोन्हीहि शब्दांच्या अर्थाविषयीं एकमत दिसत नाहीं. तरी पण 'अग्र' हा ब्राह्मणवाचक शब्द आहे असें

कबूल केलें तरी ' हार ' शब्दाला संस्कृत भाषेंत ग्रामवाचक सरळ अर्थ होऊ शकत नाहीं. यामुळेंच वरील पंडितांनीं ' हार ' याला ' ह्रियते, ' ' ह्रियंते ' किंवा ' हरति ' असा अर्थ केलेला दिसतो.

**उत्तर भारतांत आर्येतर ' पत्ति '**

' हार ', ' हारा ' हा शब्द जुन्या ताम्रपटांतून वगैरे आढळतो. बळ्ळारी जिल्ह्यांत मिळालेल्या लेखांत ' सातवाहनी हरा ' हें पद आलें आहे. तेथें ' हरा म्हणजे abode, home ' असा असा अर्थ डॉ. सुकठणकरांसारख्या तज्ज्ञांनीं केला आहे ( Epigraphia Indica XIV p. 155 ). हा शब्द प्रेहार, शिलाहारादि ठिकाणींहि दिसतो ( Mysore Arch. Rept. 1929 ). हार, हरा किंवा हर हे निराळे शब्द नसून वाड, वाडा, वड सारखीं एकाचींच निरनिराळीं रूपें होत.

' हारा ' किंवा ' हार ' याचें प्राचीन रूप ' पारा ' किंवा ' पार ' असलें पाहिजे. ' पाडा ' ' वाडा ' चींच हीं निराळीं रूपें आहेत. ' पारगांव ' यांत ' पार ' शब्द आपल्याकडे आढळतो. उत्तर भारतांत आसाम, बंगाल, बिहारकडे तेल्ल-पारा, उत्तर-पारा वगैरे ग्रामनामांतून शेवटीं हा शब्द दिसतो.

येथें असा एक प्रश्न उद्भवतो कीं, जर पट्टि, पाडि,...हट्टि हे शब्द ' देश्य ' असून द्राविड–वर्गीय म्हणविणाऱ्या संस्कृतेतर भाषेंतील असतील तर, हीं उत्तर भारतांतील ' आर्यावर्ता 'तील ग्रामनामें आर्येतर भाषेचीं कशीं ?

' पट्टि–हट्टि ' हा गट मी वर दर्शविल्याप्रमाणें संस्कृतेतर भाषेचाच असें निश्चित झाल्यास आजपर्यंत न सुटलेल्या एका महत्त्वाच्या समस्येचा परिहार होणार आहे.

' द्राविड ' शब्द मनुस्मृतीच्या पूर्वींच्या ग्रंथांतून आढळत नाहीं. ' द्राविड ' लोक आर्यांच्याहि पूर्वीं होते हें जर खरें असेल, तर स्मृतिकालापूर्वीं हे लोक कोणत्या नांवानें ओळखले जात असावेत ?

माझ्या मतें यांना ' पत्ति ' असें एक नांव असावें. वराहमिहिर ' पत्ति '–जनाचा उल्लेख करतो. हे पत्ति कोण असतील ? मध्य-काळांतील हट्टिकारांच्या पूर्वजांचें नांव ' पट्टि ' किंवा ' पत्ति ' असणें संभवनीय नाहीं काय ? यजुर्वेदीय रुद्राध्यायांत अनेक आर्येतर (-अनार्य म्हणजे रानटी नव्हे बरें !-) जनांचा उल्लेख असल्याबद्दल दुमत नाहीं. त्यांतच पत्तींचेंही नांव येतें :

' नम उच्चैर्घोषायाऽऽक्रंदयते पत्तीनां पतये नमः ॥ '

हे ' पत्ति ' कोण असतील बरें ? 'पट्टि'मध्यें वास करणारे ते पट्टि ( पत्ति ). पट्टण-पत्तन, पट्टि आणि पत्ति यांत संबंध असल्याचें सिद्ध झालें तर, यापुढें ' द्राविड ' या संदिग्ध व अनुचितार्थी शब्दापेक्षां ' पत्ति-जन ' हा प्रतिशब्द रूढ करणें समंजस ठरेल. तामिळांनाच ' द्राविड ' अशी संज्ञा असल्यामुळें त्या शब्दांत त्या वर्गांतील सर्वांचा समावेश होऊं शकत नाहीं. शिवाय ' पत्ति ' या पदप्रयोगानें या जनांची पूर्वपरंपरा वेदकालापर्यंत भिडलेली स्पष्टपणें लक्षांत येईल.

' पट्ट इल्ल '–पट्टिल असे प्रयोग प्राकृत ' सुपासनाहचरिअ ' वगैरे ग्रंथांत आढळतात. ( 'पाइअ-सद्द–महाण्णवो ' कोश पहा ). इल्ल–इल या तद्धित प्रत्ययाचा अर्थ ' त्यांत असणारा ' असा आहे. पट्टिल म्हणजे पट्टींत राहणारा असा अर्थ होतो. हे पट्टिल हट्टिकारांचे संबंधी असणें असंभवनीय नाहीं. पट्टिल शब्दाचें पुढील रूपच पाटिल किंवा पाटील. ' पाटील ' हा ब्राह्मण नव्हे. कुणबी, धनगरांना ' अहो पाटील ' असें संबोधण्याची प्रथा आहे. ' पाटील ' याचा अर्थ ग्रामाधिकारी असा मुळांत नाहीं; पुढें तसा रूढ झाला असला पाहिजे. नाहीं तर सबंध एक जातच ' पटेल ' म्हणजे ग्रामाधिकारी असणें शक्य नाहीं. ज्यांचा पाटिल-कीशीं संबंध नाहीं अशा जाती आहेत; घराणींहि पण आहेत. उत्तर कन्नड व गुजरात गॅझेटिअरांत ' Patti ' व ' Patelia ' ( पट्टि व पटेलिया ) अशा लोकजाती असल्याचें नमूद आहे. आणि पटेलिया हा शेतकरी वर्ग आहे असेंहि तेथें सांगितलें आहे.

हटगार–धनगर, पटेलिया व पट्टि या लोकजातींवरून ' पत्ति ' हे आर्येतर जन असावे असा

तर्क करण्यास कांहीं बाध येत नाहीं असें वाटतें. ते 'पत्ति' रुद्र-शिवाचे उपासक, तर आजचे 'हट-गार—धनगर' वगैरे हे लोक शिवभक्त आहेत. (विष्णु—कृष्णाची उपासना ही शैव परंपरेनंतरची आहे.)

यजुर्वेदांतील 'पत्ति' हे जर आर्येतर खरे, तर आर्येतर भाषेंतील पाडा, पाटक, पारा, ऊरा, हट्टि, पट्टण वगैरे ग्रामवाचक शब्द उत्तर भारतांत—आर्यावर्तांत कसे हें कोडें आपोआप सुटतें.

छांदोग्यांत, टोळधाडीमुळें कुरुदेशांत दुर्भिक्ष आल्याचा उल्लेख आहे : " 'मटचीहतेषु कुरुषु...' कुरुदेशावर मटचींची धाड आली, त्यामुळें, तेथील पिकांची नासाडी झाली (१-१०-१)." या वर्णनांतील 'मटची' हा काय प्राणी आहे, आणि तो शब्द कोणत्या भाषेंतील असावा याबद्दल संशोधक विद्वानांनीं बरेच परिश्रम करून शेवटीं जवळ जवळ सर्वानुमतें असें ठरलेलें दिसतें कीं 'मटची' म्हणजे टोळ; आणि तो शब्द द्राविड गणलेल्या भाषेंतला. कानडींत टोळ या अर्थी 'मिडिचे' असा शब्द रूढ आहे. आणि संस्कृतांतील 'मटची' मिडिचेला फार जवळ आहे यांत शंका नाहीं.

एका काळीं पत्तींची वसति, उत्तर भारतांत सर्वत्र होती, असें संशोधकांनीं सिद्ध केलें आहे. सिंध-बलुचिस्तानमध्यें अजून जिवंत असलेली ब्राहुई भाषा 'द्राविड'वर्गीय असें ठरलें आहे. गंगा-यमुनातीरीं जेथें प्राकृत ब्रजभाषा प्रथम निर्माण झाली तेथें त्या वेळीं द्राविडवर्गीयांची वसति असली पाहिजे, असें डॉ. रामकृष्णपंत भांडारकर यांना कबूल करावें लागलें आहे (Wilson Philological Lectures 1867, p. 46, 47, 81, 87, 108). डॉ. सुनीतिकुमार चतर्जींचें तर याविषयीं ठाम मत आहे. आर्यीकरणांमुळें आज हा वर्ग संपूर्ण अदृश्य झाला असला तरी, गांवांचीं नांवें, भाषेंतील लकबा, चालीरीतींतील कांहीं प्रकार वगैरे गोष्टींवरून येथें याबद्दल शंकेला बिलकूल जागा नाहीं, असें डॉ. चतर्जींचें मत आहे.[१]

मध्ययुगांत नर्मदेच्या दक्षिणेला पट्टि किंवा पत्तिजन दृढमूल झाले. आजहि वऱ्हाडकडे हट्टिकार कांहीं कमी नाहींत. Hatkar—Dhangars seem to have been of considerable importance in Berar असें एंथोवेन् लिहितो. पट्टि (हट्टि) किंवा पाडी जनांच्या वसाहतीच्या प्रदेशाला पट्टि, हट्टि किंवा पाडि असें नांव प्राप्त होणें साहजिकच आहे. 'महाराष्ट्र' असें संस्कृत नांव धारण करणाऱ्या प्रदेशांचें देशीय मूळ नांव 'मऱ्हाट' असें आहे. मऱ्हाट किंवा मरहट्ट या नांवांतील 'हट्ट' हें पद विचारणीय आहे. यावरून या प्रदेशाला 'हट्ट'-देश असें नांव होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. नाशिकाच्या त्र्यंबकेश्वराला 'हाटकेश्वर' असें नांव असलेलें दिसून येतें : 'द्रष्टुं त्रैलोक्यभर्तारं त्र्यंबकं हाटकेश्वरम्' असा 'वाचस्पत्यकोशां'त आधार मिळतो. बसव-पुराणांत श्रीशैलेश्वराला, 'हाटकेश्वर'

---

१ "The languages which were replaced by Magadhi—Apabhransha in Bengal were Dravidian, Kol and Monkhmer, Tibeto-Barman."—Bengali Language P. 284.

"...There are, again, some unmistakably Dravidian affinities in Bengali phonetics, morphology, syntax and vocabulary; but these agreements with Dravidian are not confined to Bengali alone, but are found in other North-Indo-Aryan languages also."

— Bengali Language : its Origin and Development.

Read also 'Kolerian and Dravidian Place-names.'—J. R. A. S. 1903, Part III.










असें संबोधिलें आहे. 'हाटकेश्वर' हें नांव शिवाला कां आलें असेल? हाट (क) देशाचा जो ईश्वर, तो हाटकेश्वर असा याचा सरळ अर्थ होण्या-जोगा आहे. हट्टि किंवा हाटक जनांचा ईश्वर असाहि याचा अर्थ होऊं शकेल. ते कांहीं असो. यावरून नाशिक ते श्रीशैलपर्यंतचा हाटकदेश असें म्हणावयास कांहीं हरकत दिसत नाहीं.

नर्मदा ते कावेरीपर्यंत राष्ट्रकूटांचें राज्य असे. राष्ट्रकूटांच्या राज्याला 'रट्ट पाडि' अशी संज्ञा होती. या पाडि--हाडि--(हाटक) देशांतच हाटकेश्वराच्या त्र्यंबक व श्रीशैल क्षेत्रांचा समावेश होतो. यजुर्वेदांतील 'पत्तीनां पति,' तोच मध्ययुगांत हट्टींचा हाटकेश्वर झाला असें म्हणण्यास हरकत काय?

### हाटकदेश किंवा सुवर्ण-भूमि

या 'हाटक' देशाला सुवर्णभूमि असेंहि म्हणणें सार्थ आहे. सोन्याला 'हाटक' असा एक पर्याय-शब्द आहे. हट्ट किंवा हाटांतील जे, ते 'हाटक'. हाटदेशांत निर्माण होणारी वस्तुविशेष, म्हणून सोन्याला 'हाटक' असें नांव पडलें असावें, असें मला वाटतें. निजाम-कर्णाटकांतील हट्टिनामक गांवांत जुनी सोन्याची खाण आहे. भरतखंडांतील जुन्यांतील जुनी खाण हीच असावी, असे सर जॉन् मार्शलनीं, मोहेंजोदारोवरील विख्यात् ग्रंथांत आपलें मत व्यक्त केलें आहे. कोडगु (कर्णाटक) प्रांतांत हरिंगी (हिरण्यांगी?) नांवाची एक नदी आहे. या नदीला कांहीं ठिकाणीं 'सुवर्णावती' असेंही म्हटलें जातें. पोन्नगुंद (हुन्नगुंद) वगैरे सुवर्णवाचक नांवाचीं गांवें या हट्टि देशांत थोडीं नाहींत. श्री-पुर, शिरोळ, शिरूर वगैरे 'श्री'-वाचक गांवें तर सर्वत्र विखुरलेलीं आहेत.

खिस्ताब्दाच्या प्रारंभापूर्वीपासून सातवाहन, कदंब, गंग, चालुक्य, राष्ट्रकूट वगैरे प्रतापशाली प्रख्यात राजवटींत हट्ट देशानें अखिल भारतीय जनांचें चित्त आंकर्षित केलें. हट्ट देश जसा कांहीं भारताचें केंद्रच बनला! वर उल्लेखिलेल्या वैभव-शाली राजघराण्यांच्या कारकीर्दींत या केंद्राकडे संपत्तीचा पूर वहात असला पाहिजे हें उघड आहे. यामुळेंहि हाट देशाचें 'सुवर्णभूमि' हें नांव सार्थ झालें असलें पाहिजे.

पण १२ व्या शतकानंतर सेऊण व होयसळ यादवां-च्या यादवींत हाट देशाचे दोन तुकडे झाले. मऱ्हाट व कन्नाड असा हा प्रदेश दुभंगला गेला. पुढें या दुफळीमुळें हट्ट देशाच्या वैभवाला ओहटी लागली; सातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूटांच्या वेळचें तें वैभव स्वप्नवत् झालें. पुनः तसली ती ऊर्जित स्थिति कधींच आली नाहीं. आज ह्या जुन्या पट्टि-हट्टीची स्मृति पार नष्ट झाल्यासारखी वाटते. तरी पण पट्टि पाडि-हट्टि या प्रकाराच्या ग्रामनामांतून थोडीफार तरी अंधुक स्मृति शिल्लक राहिली आहे, हेंच आपलें भाग्य समजलें पाहिजे.

---

## माझें स्वप्न

सत्य व अहिंसा ह्यांचा उपयोग व्यक्तीपुरताच मर्यादित न ठेवतां हीं तत्त्वें संघ, जमाती व राष्ट्र यांनीं देखील आचरणांत आणावीं ह्याकरितां प्रयत्न झाले पाहिजेत. निदान हें माझें स्वप्न आहे. हें स्वप्न वास्तव करण्याकरितांच मी जगेन व मरेन. माझ्या ह्या श्रद्धेमुळेंच मला रोज नवीन सत्याचा शोध लागतो. अहिंसा हा आत्म्याचा गुण आहे. म्हणून प्रत्येकानें जीवनाच्या हरएक क्षेत्रामध्यें त्याचें आचरण केलें पाहिजे. सर्व क्षेत्रांत जर त्याचें आचरण होत नसेल तर त्याला व्यावहारिक किंमत कांहीं नाहीं.

—म. गांधी



अनुक्रमणिका






श्री. विठ्ठलराव घाटे

# जिवंत मराठी

१९३० सालची गोष्ट. मी नुकताच विलायतेहून आलों होतों. शनिवारचा दिवस होता. दिवाणखान्यांत कांहींतरी वाचीत बसलों होतों. इतक्यांत माझे एक वृद्ध मित्र एका पाटीलबुवांना घेऊन आंत आले व म्हणाले : "या पाटीलबुवांना तुमचा सत्कार करावयाचा आहे." मी हातांतील काम बाजूस ठेवून पाटीलबुवांकडे तोंड केलें. त्यांच्या हातांत एक हार होता. ते उभे राहिले व भाषण करूं लागले : "अध्यक्षमहाराज व सभ्य गृहस्थ हो, आपले सन्मान्य पुढारी विलायतेंत उच्च शिक्षण संपादन करून मातृभूमीस परत आले आहेत" इत्यादि इत्यादि. पाटिलबुवांनीं या प्रमाणें आठदहा मिनिटें ज्ञानप्रकाश—व—केसरींतल्या परिचित अशा मराठी भाषेंत चुकतमाकत भाषण केलें व शेवटीं माझ्या गळ्यांत हार घालून माझा निरोप घेतला !

## "अध्यक्षमहाराज-सभ्यगृहस्थ" संप्रदाय !

तो प्रसंग जितका हास्यास्पद तितकाच माझ्या दृष्टीनें चिंतनीय होता. दिवाणखान्यांत आम्ही तिघेच होतों. माझ्या वृद्ध मित्रांना अध्यक्षमहाराज मानले, तरी तेथें सभ्य गृहस्थ कोणीच नव्हता. माझ्याविषयीं सभ्यगृहस्थांना उद्देशून भाषण असल्यानें, अर्थात् माझी सभ्य गृहस्थांत त्या ठिकाणीं गणना होत नव्हती. स्वतः वक्ता अर्थातच सभ्यगृहस्थ होऊं शकत नाहीं. पाटीलबुवांना या अडचणींची दाद नव्हती. तो शेतांत घाम गाळणारा आणि त्या घामाच्या रक्तापाण्यावर त्या शेतांतच उगवलेली व शतकानुशतकें पोसलेली अस्सल जिवंत मराठी बोलणारा मराठा गडी मूर्खासारखा वर्तमानपत्री आणि पुस्तकी मराठी बोलत होता. गेल्या तीस वर्षांत शेकडों खेडीं मीं पाहिलीं व हजारों पाटीलबुवांचें कृत्रिम पुस्तकी मराठी ऐकलें आहे. मला त्या त्या प्रसंगीं कौतुकहि वाटलें आहे आणि खेदहि झाला आहे.

कौतुक वाटणें साहजिकच आहे. महाराष्ट्राच्या ऐक्याच्या दृष्टीनें, महाराष्ट्रीय संस्कृतीच्या ऐक्याच्या दृष्टीनें या हजारों "अध्यक्षमहाराज व सभ्यगृहस्थ" सांप्रदायिकांची पुस्तकी व त्यांना अपरिचित अशी मराठी बोलण्याची करुणास्पद धडपड मला अवश्य अभिनंदनीय वाटते. त्याचबरोबर या धडपडीच्या मागची पार्श्वभूमि व मनोवृत्ति माझ्या दृष्टीस पडते व मला खेद वाटतो.

हे खेड्यांतले लोक आपल्यासमोर असें कां बोलतात ? आपल्याशीं अशा कृत्रिम भाषेंत बोलतां बोलतां हळूंहळूं सहज ते आपसांतहि तशी भाषा वापरूं लागतात व हळूंहळूं आपली भाषा विसरूं लागतात. हें असें कां होतें ? याचें कारण माझ्या मतें हेंच आहे कीं, या लोकांना आपल्या खडबडीत रसरशीत बोलीची शरम वाटते; ती बोलण्यास संकोच वाटतो, कमीपणा वाटतो व उलट पुस्तकांतील मुळमुळीत भाषा बोलण्यांत भूषण व प्रतिष्ठा वाटते. या कारणाचेंहि एक खोल कारण आहे. या लोकांची आपल्या जीवनावरची निष्ठा व जिव्हाळा नाहींसा होत चालला आहे. उठल्यासुटल्या शहरांकडे धांव घ्यावी असें त्यांना वाटतें. शहराची प्रबल छाया त्यांच्या जीवनावर पडली आहे. शहरांतील ते 'सिनेमे', तो 'शिंगल' चहा, ते रस्ते, ती दाटी, गडबड व गोंधळ आणि त्या दाटींतून

लोकांना धक्के मारीत पुढें जाण्यांत होणारी त्यांच्या हीनगंडाची तृप्ति–हें सारें त्यांना आवडूं लागलें आहे. शहरी लोकांचें ते अनुकरण करूं लागले आहेत. म्हणूनच वेळीं-अवेळीं "अध्यक्षमहाराज व सभ्य-गृहस्थ" पुढें डोकावतात !

रोज जगणाऱ्या जीवनावरून मन उडालें म्हणजे त्या जीवनाच्या कुशींत निपजलेली बोली तरी जिभेवर कशी खेळेल ? हळुंहळूं सुंदर समर्पक शब्दांना, म्हणींना, प्रयोगांना मराठी भाषा मुकूं लागली आहे. कोणी माझें समाधान करितात : "अहो, हें चालायचेंच. असें व्हायचेंच ! भाषेला माणसा-प्रमाणें जीवन आहे. माणसें बदलतात, त्यांची परिस्थिति बदलते, तशी भाषा बदलायचीच. जुन्या वस्तू जातात, जुन्या भावना मावळतात, तसे त्यांना व्यक्त करणारे शब्दहि त्यांच्या मागोमाग जाणारच. नव्या वस्तू आल्या, मोटारी, रेडियो, इलेक्शनें आलीं म्हणजे त्यांच्याबरोबर नवे शब्दहि यावयाचेच. जुनें जातें, नवें येतें. भाषारूपी गंगेचा प्रवाह हा असा आपला पुढें पुढें जावयाचाच."

ही विचारसरणी सदोष आहे असें मला वाटतें. भाषांचें मानसशास्त्र मी पढलों आहे. जग बदलतें, तशी भाषा बदलते हें तत्त्व मला मान्य आहे. ज्ञाने-श्वरांच्या वेळचें मराठी आज बोलण्यांत व लिहि-ण्यांत यावें असा माझा आग्रह नाहीं. मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं ज्ञानेश्वरांच्या वेळचें जेवढें जग, जेवढ्या वस्तू नाहींशा झाल्या असतील, त्यांना व्यक्त करणारे शब्द व प्रयोग अवश्य जाऊं द्या. ते जावयाचेच. पण ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, शिवछत्रपति, प्रभाकर, सगनभाऊ यांच्या वेळचें जें जग आज शिल्लक आहे, आपल्या भोंवतीं पसरलें आहे, डोळ्यांना दिसत आहे, तें जग व्यक्त करणारी भाषा मरतां कामा नये. त्या टिकाऊ जगाला व्यक्त करणारे शब्द व प्रयोग नाहींसे होतां कामा नये. जर त्या जुन्या शब्दांऐवजीं नवे समर्पक शब्द स्वाभाविकपणें भाषेच्या प्रवाहांत उदयाला आले असतील तर मग त्या जुन्या शब्दांना सुद्धां मी निरोप देईन. निरोप देतांना मला वाईट वाटेल, पण मी त्यांना "आतां या" म्हणेन. पण माझा दावा असा आहे कीं, ज्या जुन्या, ज्या सनातन वस्तू आज हयात आहेत आणि नुसत्या हयात आहेत असें नव्हे, तर चांगल्या जोमांत आहेत (–कां तें पुढें पाहूं–) आणि ज्यांना व्यक्त करावयास आम्ही नवीन संकेत व नवीन शब्द निर्माण केले नाहींत, त्या वस्तुवाचक हजारों शब्दांचा आम्ही निष्काळजीपणानें व अज्ञानानें त्याग करीत आहोंत व मराठी भाषेचा अक्षम्य गुन्हा करीत आहोंत.

## ग्रामीण विश्वाच्या प्रतिबिंबाचें प्रतिबिंब !

कसें तें पहा. जुन्या जगांतील काय गेलें आहे ? आमचें राष्ट्रीय जीवन ज्या एका मूलभूत व्यवसाया-मध्यें-व-भोंवतीं केंद्रित झालें आहे, उभारलें गेलें आहे, तो आमचा राष्ट्रीय व्यवसाय म्हणजे आमची शेती. आजहि ती पूर्वींइतकीच मध्यवर्ती आहे, जीवन-स्पर्शी आहे. शेती म्हटलें म्हणजे एक स्वयंपूर्ण असें जगच आपल्या डोळ्यांपुढें उभें राहतें. शेती म्हणजे नानाविध स्वरूपांत नटलेलीं पंचमहाभूतें, अनंत रूपानें भासमान होणारा, अहोरात्र आपल्या भोंवती वावर-णारा निसर्ग ! या निसर्गाच्या अंकावरच आजहि आमचें ग्रामीण जीवन जगलें जात आहे. तेथें आड-पडदा नाहीं. प्रत्यक्ष समोरासमोरचा तो सामना आहे. अनेक शतकांचें तें आलिंगन आहे !! हें निसर्गनिष्ठ जीवन जगत असतां, निसर्गाचे नाना-बाजूंनीं, नाना प्रकारांनीं मनावर व शरीरावर सतत बरेवाईट कठीण-मृदु आघात होत असतां भाषेची वाढ होत असते. निसर्गांतल्या वस्तुजाताला भाषेंत स्थान मिळतें, ओघानें स्वभावतःच शब्द जन्माला येतात, घडले जातात.

या ग्रामीण विश्वांतलें काय नाहींसें झालें आहे ? नानादिशांनीं आजहि वारे येतात, वादळें सुटतात. त्यांना नांवें आहेत, होतीं. पूर्वींचेच ऋतू आहेत. आज पाठ्य पुस्तकांत येऊन बसल्यामुळें 'मतलई' तेवढा टिकला. दर खेड्यांत पूर्वींचीच 'पांढरी' व 'काळी' आहे, खळीं आहेत; पूर्वींचीच वायं-गणें आहेत, खाजणें आहेत. पूर्वींसारख्याच जत्रा, उरूस भरतात, कंदुऱ्या होतात, नवस फेडले जातात; पूर्वींच्याच ग्रामदेवता आहेत व त्यांचे 'उच्छाव' होतात; पूर्वींसारखेच 'हगामे' व 'फड' भरतात.

पूर्वींच्याच वनस्पती, पूर्वींचेच व्हाळ, साकव, टेकड्या मुरमाड जमिनी; पूर्वीचीच लागवड, मशागत, कापणी, मळणी; पूर्वींचेच कारूनारू; पूर्वींचाच दर्या, गलवतें, शिडें, मासळ्या, जाळीं. जुनें विश्व, जुने व्यवसाय, जुने ऋणानुबंध तसेच आहेत. त्यांचें प्रतिबिंब आमच्या ग्रामीण भाषेंत पडलेलें आहे. त्या प्रतिबिंबांचें प्रतिबिंब आमच्या शहरी भाषेंत उत्प्रेक्षांच्या रूपानें रूढ आहे. परंतु आमची, आमच्या पाटीलबुवांची या निसर्गनिष्ठ जीवनावरची निष्ठा उडत चालली आहे. अनुभव तेच येतात. संस्कार तेच घडतात पण ते मनाची पकड घेत नाहींत व त्यांना वाचा फुटत नाहीं.

हें जें वर सांगितलें हें जीवन जर आज आमच्या ग्रामीण जगांत नांदत आहे, तर त्याला व्यक्त करणारी भाषा पाहिजेच. ती नाहींशी होतां कामा नये. हें जीवन जगतांना ज्या भावना विकसित होतात, जी मनाची घडण तयार होते ती विशिष्ट तऱ्हांनीं, लकबींनीं, म्हणींनीं व प्रयोगांनीं व्यक्त होत असते. हें जिवंत भाषेचें लक्षण आहे. कोल्हापूर-साताऱ्याकडे आज्ञार्थी बहुवचनीं "तुम्ही जावा" असा प्रयोग करितात. वास्तविक तो आमच्या व्याकरणांत रूढ झाला पाहिजे. त्याची गरज आहे. पण कोणी "तुम्ही जावा" "तुम्ही खावा" म्हटलें म्हणजे आम्ही हंसतों. तसें म्हणणारा पुढच्या खेपेला ते प्रयोग टाळतो. असेंच होत गेलें तर ते प्रयोग वापरांतून जातील. साताऱ्याकडे खेड्याकडील ब्राह्मण-अब्राह्मण सर्व 'पास्न' हे शब्दयोगी अव्यय व 'त्यास्न' 'यास्न' हे शब्द परवां परवांपर्यंत वापरीत असत. आतां ते ऐकूं येत नाहींत. खानदेशाकडे 'धकेल' हें एक छानदार क्रियापद रूढ आहे. आम्ही त्याला हसूं लागलों म्हणजे तें जाईल व आमच्या भाषिक ऐक्यांत भर पडेल—पण हानीनें ! मृगाच्या आरंभाला 'अगोट' हा एक चपखल शब्द आहे, होता. आतां शेतकरीहि तो शब्द वापरतांना आढळत नाहीं. घट्ट पिठल्याला कितीजण आतां 'आळण' म्हणतात ? आणि 'कोरड्यास' किती सूचक समर्पक होतें ? 'पाटा 'पेक्षां 'पिठें' काय वाईट होतें ? 'कोनाड्या 'पेक्षां 'देवळी' ? 'पायतण' जात चाललें, 'वहाणा' आल्या; 'कवाड' गेलें 'दार' आलें; आळण 'तवलीं'त किंवा, 'चिटकीं'त होत होतें. कोठे आहेत त्या ? आमची घरोघर दिसणारी 'मावळण' जात चालली. 'आत्या' आली. 'मायंदळ' शब्द काय छान होता ! पण तो वापरण्याची खेड्यांतसुद्धां शरम वाटूं लागली. 'टकुऱ्या'ची अशीच आतां शरम वाटते. किती अर्थवाही 'रसरशित' शब्द होता तो. संमति दाखविणारे 'बेस बेस' किती छान होतें ! समर्थांनीं दासबोधांत 'पडशाळा' हा शब्द थोडा वेळ पडण्यापहुडण्याची जागा या अर्थी वापरला. तो आमच्या वापरांतून गेला व प्रसंग पडला तेव्हां वेटिंग रूमसाठीं आम्ही कांहींतरी नवीन घेडगुजरी संस्कृत शब्द तयार करूं लागलों. तसें म्हटलें तर मराठीपेक्षां आम्हांला संस्कृत अगर इंग्रजी पत्करते. 'बायको' चालत नाहीं, 'आमची पत्नी,' 'आमची वाइफ' लागते.

माझ्या दुर्दैवानें मला अनेक वर्षे खेड्यांतील मुलांचे हजारों निबंध तपासावे लागले आहेत. ते वाचतांना हीं पोरटीं खेड्यांत जन्मलीं, वाढलीं, निसर्गाच्या अंकावर खेळलीं, का तीं सर्व पुण्याच्या टिळक-रोडवरून व दादरच्या हिंदु कॉलनींतून धरून आणलीं हें समजत नसें. निबंधांचे विषय ग्रामीण जीवनावरचे असतात. पण हे मोठ्या आढ्यतेनें उपोद्घात करितात, व्याख्या करितात आणि उपसंहार करितात. त्यांच्या निबंधांत त्यांचे अनुभव, त्यांचें निरीक्षण, त्यांची भाषा, म्हणी, लकबा आढळत नाहींत. काय हें भयंकर भाषिक ऐक्य ? आमचें दयाळु सरकार एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत, शहरांत व खेड्यांत एकच भाषाविषयक पाठ्यपुस्तक नेमून या भाषिक ऐक्यांत महत्त्वाची भर आतां घालणार आहे. साराच 'उपसंहार'—नव्हे 'संहार' होणार आतां !

### आमच्या ग्रामीण जीवनाचा करंटेपणा

खेड्यांतील बायकांनीं अद्यापि भाषा जिवंत ठेवली आहे. पण सक्तीच्या निर्जीव निर्विकार शिक्षणाच्या चरकांतून त्यांच्या मुलीसुना निघाल्या म्हणजे त्या भाषेचाहि 'उपसंहार' होईल. गांवोगांव पिठाच्या गिरण्या सुरू झाल्यानें आधींच आमचीं जात्यावरचीं गाणीं नाहींशीं होत चाललीं आहेत,

कहाण्या, उखाणे, गवळणी, धांवे, भूपाळ्या जात चालल्या आहेत. आमच्या निःसत्त्व एकमार्गी यांत्रिक शिक्षणपद्धतीच्या माऱ्यापुढें या बायकांची काय बिशाद आहे ! त्यांची भाषा जिवंत राहील अशी आशा वाटत नाहीं. त्या बायका शहरांतल्या त्यांच्या सुशिक्षित भगिनींच्याच पंथाला लागणार !

मी जीर्णोद्धारवादी नाहीं. भाषा बदलणारच. कांहीं शब्द समर्पक व आवश्यक असूनसुद्धां जाणार. कांहींची जागा रिकामी राहणार, कांहींची भरून निघणार, हें मला मान्य आहे. ही क्रिया स्वाभाविकपणें भाषेच्या देहधर्माप्रमाणें होत असती तर तक्रार करण्याचें कारण नव्हतें. दुःखाची गोष्ट ही आहे कीं, हें सर्व आमच्या औदासीन्यामुळें, बेफिकीर वृत्तीमुळें होत आहे, आणि याच्या बुडाशीं आमच्या ग्रामीण जीवनाची अधोगति, करंटेपणा, स्वाभिमानशून्यता आहे. आमचे पाटीलबुवा प्रत्येक गोष्टींत शहरी संस्कृतीचें अनुकरण करूं लागले आहेत आणि म्हणूनच आमच्या खेडयांतून जिवंत मराठी नाहींसें होऊन पुस्तकी मराठी येत चाललें आहे.

वास्तविक उलटें व्हावयाला पाहिजे होतें. भाषा कशी जन्मते ? कशी वाढते ? आरंभीं केवळ क्रियावाचक शब्द, क्रियापदें जन्माला येतात. फेंकणें, धरणें, पळणें मारणें, खाणें इत्यादि शब्द आधीं तयार होतात. विस्तवाचा शोध लागल्यावर 'भाजणें'ची भर पडत असेल. शेतीचा शोध लागल्यावर तिच्यांतील नाना व्यवसायांसंबंधीं कृतिवाचक शब्द पुढें तयार होत असतील. हा भाषेचा मूळचा पाया. या क्रियावाचक शब्दांवर मुलामा चढवून आम्ही शहरी लोक त्यांच्या उत्प्रेक्षा बनवितों व वैचारिक आणि भावनात्मक क्रियापदें तयार करितों. सहज ऑक्सफर्ड कोश उघडला. त्यांत चार-पांच क्रियापदें आढळलीं. तींच देतों : apprehend, comprehend या क्रियापदांचा मूळ अर्थ 'हातानें पकडणें'; मग झाला 'समजणें, आकलन होणें'. upbraid चा मूळ अर्थ '०च्यावर हात टाकणें;' मग झाला 'निंदणें,' 'टोमणा मारणें'. 'undertake,' 'underhand' 'undergo' 'understand' या क्रियापदांतील मूळचे उत्प्रेक्षित अर्थ सहज लक्षांत येण्यासारखे आहेत.

आमच्या भाषेला

आमच्या मातीचा वास आला पाहिजे

क्रियाशील व कर्तबगार माणसें अशी भाषा बनवीत असतात व मग ऐतखाऊ विचारी माणसें या उसन्या मालावर आपला संसार थाटीत असतात. विचार आणि भावना यांचा उगम कृतींमधून, श्रमांतून—स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या—असतो. तेव्हां खेडयांपाडयांतील लोकांनीं निसर्गाच्या सांनिध्यांत संघर्षांत व संयोगांत नानाप्रकारचीं कृत्यें, व्यवसाय करावें आणि आम्ही पांढरपेशा लोकांनीं त्यांच्या रसरशित ताज्या, कच्च्या अशोधित माला-( ore ) ला—शब्दसंपत्तीला आमच्या बुद्धीच्या मुशींत तावून सुलाखून शुद्ध करावें, त्याचीं नाना लेणीं तयार करावीं व आमच्या भाषेचें व वाङ्मयाचें वैभव वाढवावें अशा प्रकारचा व्यवहार व्हायला पाहिजे. इंग्रज येण्यापूर्वी आमचीं शहरें खेडयांपासून इतकीं स्वतंत्र झालीं नव्हतीं. त्यांचीं मुळें खेडयांतच खोल गेलेलीं असत व म्हणून शहरी भाषेला त्या खेडयांतील मातीचा ताजा वास येत असे. इंग्रजी भाषेनें आमच्यामध्यें येऊन आमचीं तीं मुळें आमच्यापासून अलग केलीं. आम्ही त्रिशंकू बनलों. आम्ही मराठी बोललों किंवा लिहिलें तरी तो इंग्रजी वाक्यरचनेचा, लकबांचा, शब्दांचा अनुवाद असतो. वास्तविक लेखन हें भाषणाला अनुसरलें पाहिजे. आमचें उलटें झालें आहे. आमचें भाषण लेखनाची नक्कल करूं लागलें आहे. या आमच्या भाषेला मातीचा वास कसा येणार ? ती माती विलायतेंतली. तो निसर्ग, तें वातावरण इंग्रजी. त्याच्या संस्कारानें आमचें मराठी जिवंत, ताजें कसें होणार ! आम्ही आमच्या मुळाकडेच वळलें पाहिजे, त्याचा आधार घेतला पाहिजे व त्या आधारावर ताठ उभें राहिलें पाहिजे. रामायणांतल्या अहिरावण-महिरावणांचें अंग जमिनीला लागलें म्हणजे त्यांना परत बळ चढत असे. आम्हीहि अहिरावण बनून आमच्या मातींत लोळलें पाहिजे. आमच्या टेकडया पायाखालीं तुडवल्या पाहिजेत, आमचे व्हाळ, आमच्या वनस्पती, पिकें, गुरें, पक्षी, तारे, वादळें यांचा अनुभव घेतला पाहिजे. खेडयांतील जनतेंत मिसळलें पाहिजे. त्यांच्या ताटांत त्यांची

[ पुढील मजकूर पान २४ वर पाहा ]

श्री. दि. के. बेडेकर

# रससिद्धान्ताचें स्वरूप : (१) रसव्यवस्थेची पार्श्वभूमि

[1] संगीत, नृत्य, नाट्य, काव्य इत्यादी कला प्राचीनतम काळापासून अस्तित्वांत आहेत. मनुष्याच्या प्रगल्भ बुद्धिभावना व सामाजिकता यांचें कलानिर्मिति हें फल आहे व लक्षणहि आहे, म्हणून त्या समाजाइतक्याच प्राचीन आहेत.

कलानिर्मिति व तिचा आस्वाद या गोष्टी अमुकच एका देशांतील किंवा कालखंडांतील नसून चिरंतन व देशकालनिरपेक्ष आहेत. पण अगदीं ढोबळ सामान्य अर्थानेंच असें म्हणणें बरोबर होईल. सामान्य अर्थ सोडून प्रत्यक्षांत शिरलें कीं लगेच आपल्यापुढें ग्रीक, हिंदू, फ्रेंच इत्यादि कलांचें विविधवस्तुभांडार दिसूं लागतें. प्रत्येक कलाकृति ही सामान्यतः रसोत्पत्तीला प्रेरक व आनंददायी असते, पण प्रत्यक्षतः प्रत्येक कलाकृतीची प्रेरणा व आस्वाद देशकालानें मर्यादित असलेला आढळतो. प्रत्येक कलाकृतीला सामान्य स्वरूप येतें खरें पण त्यासाठीं तिच्याभोंवतीं कोषाप्रमाणें असणाऱ्या देशकालस्थितीशीं भिन्न कालांतील रसिकाला समरस व्हावें लागतें.

कलेचें सामान्य स्वरूप व देशकालानुरूप तिचीं विशिष्ट विविध रूपें यांचा विचार कलास्वरूपशास्त्रां- ( aesthetics ) मध्यें केला जातो; आणि या शास्त्राच्या प्रदीर्घ विकासक्रमांत प्राचीन व अर्वाचीन विचारवंतांनीं जीं पावलें टाकलीं, त्यापैकीं ' रस-व्यवस्था ' हें एक महत्त्वाचें पाऊल आहे. मध्ययुगीन भारतीय संस्कृतीनें कलास्वरूपशास्त्रांत घातलेली ती एक मौल्यवान् भर आहे.

## सिद्धान्त व शास्त्र यांचा संबंध

रससिद्धान्त व कलास्वरूपशास्त्र यांचा परस्पर-संबंध जर आधीं स्पष्ट झाला तर माझ्या पुढील सर्व विवेचनाचें सूत्र वाचकांना उमगेल. म्हणून त्या संबंधाचें स्पष्टीकरण मी येथेंच करीत आहे. कोणतें-हि शास्त्र घेतलें तर त्याची प्रगति हळुंहळूं व कष्टानें झालेली आढळते व त्या प्रगतींतहि सिद्धान्तांची एक सोपानपरंपरा आढळते. प्रत्येक सिद्धान्त हा विशिष्ट देशकालांतील ' त्रिगुण ', ' त्रिदोष ', ' गुरुत्वाकर्षण ', ' ईथर ', ' अणु ', ' विद्युत्-लहरी ' इत्यादि प्रयोगसिद्ध, तशाच प्रमेयरूप गोष्टींचा आणि परंपरागत माहितीचा व सूत्रांचा आढावा घेऊन बनविला जातो व त्या सिद्धान्ताला एक स्वयंपूर्ण रचना लाभावी लागते. न्यूटन, भरतमुनि, शंकराचार्य, आइन्स्टाइन वगैरे प्रतिभावान् युग-प्रवर्तकांनीं जे सिद्धान्त रचले ते एकेका पूर्ण मंदिरा-प्रमाणें आपापल्या परीनें स्वयंपूर्ण असेच होते. परंतु त्यांना देशकालस्थितीची व समकालीन ज्ञानसंपदेची बैठक व मर्यादाहि होती. सिद्धान्त हे स्वयंपूर्ण असून मर्यादित असतात. उलट शास्त्र हें कधींच पूर्णत्वाला न पोचलेलें पण अपरिमित असतें; अनेक सिद्धान्तांच्या सोपानपरंपरेंतून शास्त्राची अखंड प्रगति चालू असते.

---

१ महाराष्ट्र साहित्य-संमेलनाच्या मे १९५० मध्यें भरलेल्या अधिवेशनांत ' टीका '–शाखेच्या संमेलनापुढें प्रस्तुत निबंध मीं सादर केला होता. —लेखक








प्रत्येक शास्त्राची अखंड ज्ञानसाधना चालू आहे. प्रत्येक सिद्धान्त ही त्या साधनेंतील एकेक पायरी आहे, असें मानलें म्हणजे अमुक सिद्धान्त चूक आहे व तमुक बरोबर आहे, हा निकष लावून खंडनमंडन करीत राहणें हें चूकच ठरतें. वस्तुत: प्रत्येक सिद्धान्त हा समकालीन ज्ञानाची बैठक, संपदा व मर्यादा यांच्या दृष्टीनें अगदीं बरोबरच असतो. पण पूर्वकालीन सिद्धान्तांत नव्या ज्ञानसंपदेमुळें उणीवा दिसूं लागल्यानंतरच कोणातरी प्रतिभावान् मनुष्याकडून एक नवाच सिद्धान्त मांडला जातो. कालांतरानें ज्ञानांत आणखी भर पडल्यावर हा नवा सिद्धान्तहि चूक ठरणें अटळ असतें. पूर्वकालीन सिद्धान्तांचें खंडन करून ज्ञानाच्या शिखरावर शोभूं लागलेला सिद्धान्त पुन्हां खंडित होऊन नव्याच सिद्धान्ताला ती जागा देतो, असा क्रम शास्त्र-विकासांत दिसतो.

## कलास्वरूपशास्त्राचा विषय व उद्दिष्ट

शास्त्रविकासाचा हा प्रत्यक्ष नियम लक्षांत घेऊन रससिद्धान्ताकडे पाहिलें पाहिजे, हें सूत्र लक्षांत ठेवून मी प्रस्तुत चर्चा करणार आहे. कलास्वरूप-शास्त्राचा विषय अर्थातच या शास्त्रांतील सर्वच दर्शनांना व प्रमेयांना लागू आहे. रससिद्धान्त असो कीं हेगेलची कलाविषयक मीमांसा असो त्यांत कलानिर्मिति व कलास्वाद हाच मुख्य विषय असणार हें उघड आहे.

'ज्ञान कसें होतें?' हा ज्ञानस्वरूपशास्त्रा-(epistemology)चा मुख्य प्रश्न आहे. 'मनो-विकार कसे उत्पन्न होतात?' हा मानसशास्त्राचा प्रश्न आहे. त्याचप्रमाणें 'कला कशी निर्माण होते?' हा कलास्वरूपशास्त्राचा प्रश्न आहे.

'कलाकृति' हा कलास्वरूपशास्त्राचा एकमेव विषय आहे; पण नेमकें हेंच अवधान सुटल्यामुळें या शास्त्राच्या परिसरांत गोंधळ उत्पन्न झाला आहे. निदान 'रसव्यवस्थे'च्या अनुषंगानें तर मराठीं-तल्या कलाविषयक चर्चेंत हा गोंधळ इतका माजला आहे कीं 'कलाकृति' हा मुख्य विषयच सुटून तथाकथित मानसशास्त्रीय चर्चेंत कालापव्यय होत आहे.

'कलानिर्मितीचें स्वरूप'[२] ह्या दीर्घ निबंधांत माझी यासंबंधींची भूमिका मी विशद केली आहे. येथें एवढेंच सूचित करतों कीं हर्षशोकभयादि मानवी भावनांची अनुभूति, आविष्कार व पुन:-प्रत्यय या सर्व मनोव्यापारांचें कलानिर्मितीशीं किंवा कलास्वादाशीं चपखल समीकरण बसविणें अगदीं चूक आहे. उलट कलात्मक व्यापार हा ज्ञानक्रियेहून व भावनात्मक व्यापाराहूनहि वेगळा आहे, हेंच नीट ध्यानांत घेतलें पाहिजे. 'शाकुंतला'सारख्या एखाद्या कलाकृतींत केवळ शृंगारकरुणादि भावनांचाच नव्हे तर राजधर्म, कर्मवाद इत्यादि सामाजिक श्रेयांचा व बुद्धिगम्य प्रमेयांचाहि वापर कलावंतानें केला आहे हें पाहणें आवश्यक असतें खरें. पण हा वापर कलात्मक रीतीनें केलेला असतो हेंच विसरून केवळ समाजशास्त्रीय किंवा केवळ मानसशास्त्रीय घटना हाच 'शाकुंतला'चा आशय मानणें योग्य होणार नाहीं.

सारांश, 'रसव्यवस्था' हा एक मानसशास्त्रीय सिद्धान्त नसून कलास्वरूपशास्त्रांतील भारतीय प्रमेय आहे, ही गोष्ट ध्यानांत वागवून भरतमुनींच्या नाट्य-शास्त्रांत प्रतिपादन केलेलें या व्यवस्थेचें वास्तविक स्वरूप आपण तपासलें पाहिजे. हें करतांना रस-व्यवस्थेसंबंधींच्या डॉ. वाटवेप्रभृतींच्या मीमांसेची तपासणी करणें मला आवश्यक वाटलें आहे. रस-व्यवस्थेबद्दल माझी भूमिका खंडनाची नाहीं व तिला अद्ययावत् बनवून उपयुक्त करण्याचीहि नाहीं. तिचें वास्तविक स्वरूप ओळखणें एवढाच माझा मर्यादित हेतु आहे. ह्या स्पष्टीकरणानंतर मी मुख्य विषया-कडे वळतों.

रसव्यवस्था भरतमुनींनीं प्रथम प्रौढ स्वरूपांत मांडली. त्यांचा काळ इसवी सनाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकांतला आहे. त्याच वेळीं 'चरक-संहिते'-सारखे आयुर्वेदावरील ग्रंथहि निर्माण झाले आहेत.

---

२ 'वाङ्मयीन वाद' ह्या साहित्य–परिषदेनें प्रकाशित केलेल्या पुस्तकांत हा निबंध आहे.

याच सुमारास बौद्ध व सांख्य-योगादि दर्शनें प्रौढ अवस्थेला पोंचत होतीं. सारांश, या सुमारास या सर्वच क्षेत्रांत भारतीय विचारांची एक प्रौढ अवस्था आपल्याला दिसून येते. या विभिन्न क्षेत्रांतील विचार हे नुसते सुटेसुटे बनत गेले आहेत असेंहि नाहीं; उलट, तत्त्वज्ञान, आयुर्वेद, नाट्य वगैरे क्षेत्रांत मिळून आपल्याला एक व्यूह किंवा रचना दिसते व प्रत्येक क्षेत्रांत इतर क्षेत्रांतील विचारांची परिभाषेची व विचारसूत्रांची छाया दिसते व देवाण घेवाण आढळते. सर्वांची अशीच एक एकजीव परंपराहि दिसते. भरतप्रणीत नाट्यवेदाची किंवा नाट्यशास्त्राची ही पार्श्वभूमि आहे. कोणत्याहि देशाची किंवा समाजाची कला ही त्याच्या संस्कृतीचें साररूप दर्शन असतें, ह्या नियमाला भरतमुनींचें नाट्यशास्त्र हें अपवाद कसें असेल ?

या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं त्यांनीं नाट्यशास्त्र लिहिलें त्या वेळीं कालिदासाची उत्तरकालीन प्रौढ रंगभूमि नव्हती. कोणताहि शास्त्रवेत्ता आपल्यानंतरच्या कलाकृतींचें शास्त्र रचीत नाहीं तर समकालीन कृतींचें शास्त्र पूर्वकालीन परंपरेला व अनुभवांना धरून रचतो. कालिदासाचा काळ व भरताचा काळ यांतील अंतर महत्त्वाचें आहे. पण याची चर्चा न करतां मी प्राचीन रसव्यवस्थेकडेच वळतों.

## ' काव्यार्थ ' म्हणजे काय ?

रसव्यवस्थेच्या आकलनासाठीं रसापासून सुरुवात न करतां मी ' काव्यार्था ' पासून प्रारंभ करतों. काव्यार्थ म्हणजे आज मराठींत सरळ व सहज अर्थ निघतो कीं कवितेचा अर्थ. पण हा मराठींत सहज निघणारा अभिप्राय नाट्यशास्त्रांतील ' काव्यार्थ ' या संज्ञेतून खरा निघत नाहीं.

एक सर्वसाधारण बाबच येथें मी नमूद करतों. कारण तिचा पुढील विवेचनांत वारंवार संबंध येणार आहे. ' काव्यार्थ ' संज्ञेचा मूळ अभिप्राय व आजचा रूढ मराठी अर्थ यांत तफावत पडली. अनेक शब्दांच्या बाबतींत असेंच झालेलें आहे. ही तफावत तत्त्वज्ञान, आयुर्वेद, नाट्य इत्यादि सर्वच क्षेत्रांत झालेली आढळते. आजच्या मराठींत ज्या ज्वराला ' विषमज्वर ' म्हणतात तो ज्वर आयुर्वेदीय परिभाषेंतला विषमज्वर नाहीं; किंवा तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत ' प्रकृति ', ' गुण ', ' कर्म ' इत्यादि संज्ञांना जे मूळ अर्थ आहेत ते आजच्या मराठींत उरलेले नाहींत. साध्या व्यावहारिक भाषेंतहि ' परोक्ष ' व ' अपरोक्ष ' या शब्दांचे अर्थ आपण नेमके उलटसुलट फिरविले आहेत व ' चेष्टा ' या शब्दाची तर मराठीनें चेष्टाच केली आहे !

तेव्हां प्राचीन विचार तपासतांना संज्ञांचे प्राचीन अर्थ लक्षांत न घेतले तर अनर्थ होण्याचा धोका आहे, हें लक्षांत बाळगणें जरूर आहे. ' काव्यार्थ ' शब्दाच्या बाबतींत हाच नियम लागू आहे. प्रथम कवि म्हणजे कोण ? तर नाट्याच्या अभिनयादि व्यापारांना वाङ्मय म्हणजे संवाद पुरविणारा असाच अर्थ नाट्यशास्त्रांत घेतला पाहिजे. यज्ञ-क्रिया किंवा विधी चालू असतांना त्या क्रियेला अनुरूप मंत्र म्हणणारे ते कवि असा परंपरागत अर्थ आहेच. एकाकी व चिंतनमग्न असा आधुनिक कवि किंवा निवांतपणें टेबलखुर्चीशीं बसून नाटकें लिहून काढणारा आधुनिक नाटककारहि जुन्या कवीसारखा नाहीं. किंबहुना शेक्सपिअरहि निवांतपणें रंगभूमीपासून दूर कोठें तरी बसून नाट्यसंवाद रचीत नसे. उलट प्रत्यक्ष प्रयोगांतच ' विंग्ज़ 'मध्यें बसून तो संवाद रचीत असे व अशा रीतीनें नाटकें ' बसवीत ' असे, असा पुरावा अलीकडे उपलब्ध झाला आहे.

थोडक्यांत, कवि हा नाट्यापासून अलग मानून उपयोगी नाहीं. नाट्यप्रयोगांतील नटाइतकाच व प्रेक्षकाइतकाच तोहि नाट्याशीं एकरूप असलेला एक घटक मानला पाहिजे. काव्य म्हणजेहि अर्थातच नाट्य-संवाद असा अर्थ घेतला पाहिजे. भरतांनीं ' वागङ्गसत्त्वोपेतान् काव्यार्थान् ' असें म्हटलें आहे. आजच्या कवितेला ' वागङ्गसत्त्वोपेत ' म्हणजे रंगभूमीवरच कळूं शकणारी म्हणतां येणार नाहीं. तेव्हा भरतांचें काव्य म्हणजे नाट्याचें काव्य असाच अर्थ नाट्यमीमांसेंत घेतला पाहिजे.

आतां ' अर्थ ' म्हणजे काय ? काव्याचा भावार्थ असा अभिप्राय बरोबर होईल काय ? मुळींच नाहीं. या ठिकाणीं ' अर्थ ' शब्द प्राचीन परिभाषेंतला आहे हें ओळखून त्याचा अभिप्राय

' विषय ' असा घेतला पाहिजे. तत्त्वज्ञानामध्यें ' बाह्यार्थ ' म्हणजे ज्ञानाचे बाह्य विषय असा रूढ प्रयोग आहे. तसाच ' काव्यार्थ ' म्हणजेहि नाट्यांमधील पात्रें, त्यांचीं नाट्यगत कृत्यें, इतर घटना वगैरे सर्व विषय किंवा नाट्यवस्तू होत. या 'काव्यार्थां 'ना वास्तवामधील अर्थांची ' सत्ता ' किंवा अस्तित्व नाहीं. खरा राजा व नाटकांतला राजा हाच तो फरक आहे. लोकधर्मी ते अर्थ व नाट्यधर्मी ते काव्यार्थ असा हा फरक भरतांनीं केलेला आहे.

' काव्यार्थ ' हाच विवेचनाचा योग्य प्रारंभ कां ? तर या काव्यार्थाचें विभावन, अनुभावन व भावन होतें व रसोत्पत्ति होते. हाच रसव्यवस्थेचा खरा प्रतिपाद्य विषय आहे. याच अर्थानें भरतांनीं म्हटलें आहे कीं ' न हि रसादृते कश्चिदप्यर्थः प्रवर्तते । विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः । ''[३]

' नहि रसादृते कश्चिदप्यर्थः प्रवर्तते ' या सूत्रावरून स्पष्टच होतें कीं रसहीन अशा लौकिक किंवा वास्तव सृष्टींतील अर्थांचा विचारच नाट्यशास्त्राला अभिप्रेत नाहीं. नाट्यांतील अर्थांचाच फक्त विचार भरतांना करावयाचा आहे व नाट्यांतील प्रत्येक शब्द, पात्र व घटना ही रसपूर्णच असणार.

## काव्यार्थांतील रसांची अभिव्यक्ति

' काव्यार्थ ' म्हणजे नाट्यविषय. ते रसपूर्ण असतात हें तर भरतांनीं गृहीतच धरलें व तें रास्तच आहे. पण मग भरतांपुढें प्रश्न असा पडला कीं, काव्यार्थच रसपूर्ण असतात व प्रेक्षक त्या रसांचा सरळ प्रत्यक्ष आस्वाद घेतात असें जर म्हणावें तर मग या नाट्यव्यापाराचें प्रयोजन किंवा कार्य काय? एखाद्या फुलाचा वास घेण्याच्या क्रियेंत फूल व वास घेणारा एवढेंच पुरतें. वास घेण्याची क्रियाहि सरळ प्रत्यक्ष असते. पण काव्यार्थांमधील रसाचा आस्वाद प्रेक्षकांना घेतां येण्यासाठीं अभिनयादि गोष्टी साधनरूप होतात. प्रयोगाखेरीज रसांचा आस्वाद घेणें प्रेक्षकांना शक्य होत नाहीं. थोडक्यांत म्हणजे काव्यार्थगत रस व प्रेक्षकांनीं आस्वादिलेला रस ह्यामधले दुवे उलगडल्याशिवाय नाट्यशास्त्राची सिद्धि होणार नाहीं हें भरतांनीं ओळखलें व म्हणूनच ' भावा 'दि प्रमेयरूप पदार्थांची कल्पना केली.

भरतांनीं या ठिकाणीं असें गृहीत धरलें कीं, काव्यार्थगत रस हा अभिव्यक्त नसतो तर फक्त बीजरूपानें व अव्यक्त असतो आणि या अव्यक्त रसांची अभिव्यक्ति नाट्यप्रयोगांत होत जाते. या अभिव्यक्तीसाठीं मध्येंच ' भाव ' या पदार्थांचा पायरीसारखा उपयोग होतो. भाव हे ' काव्यरसाभिव्यक्तिहेतु ' आहेत असें भरतांनीं स्पष्टच म्हटलें आहे ( नाट्यशास्त्र, पान ८० ). ' रस ' व 'भाव' हे दोन्ही आस्वाद्य आहेत तेव्हां ' भावां ' पासून ' रस ' कीं ' रसां ' पासून ' भाव ' असा प्रश्न उपस्थित करून भरतांनीं त्याचें जें उत्तर दिलें आहे कीं, ' रस ' हेच बीजरूप व मूळ आहेत, तें याच अभिप्रायानें.

## अभिव्यक्तीचें भारतीय तत्त्व

नाट्यरस हे अव्यक्त अवस्थेमधून अभिव्यक्त होतात व मग आस्वाद्य होतात हा भरतमुनींचा सिद्धांत आज चमत्कारिक वाटेल. कारण प्राचीनांचें शृंगारकरुणादि रस म्हणजे मानवी मनाला सहज व प्रत्यक्षच प्रतीत होणाऱ्या ' भावना ' (emotions) आहेत असा आपण गैरसमज करून घेतला आहे. अशा ' भावना ' अव्यक्त असणें व त्या अभिव्यक्त बनून आस्वाद्य होणें याचा अर्थच लागत नाहीं. पण, भरतांच्यांपुढें ही आधुनिकांनीं गैरसमजानेंच उभारलेली अडचण नव्हती. उलट, अव्यक्तांतून अभिव्यक्ताचा पसारा सृजन पावतो हें तत्त्व त्यांनीं भारतीय विचारसंपदेंतून सहजच मिळविलेलें होतें. सांख्य व इतरहि दर्शनांनीं आणि त्यांच्या प्रभावामुळें आयुर्वेदादि विद्यांनीं हेंच अभिव्यक्तीचें तत्त्व स्वीकारलेलें होतें आणि भरतांना तें सहजप्राप्त होतें. याच चाकोरींतून किंवा सूत्रानुरोधानें सारें नाट्यशास्त्र भरतांनीं रचलें यांत आश्चर्य तर नाहींच, पण हें सूत्र आधुनिकांनीं

---

३ ' नाट्यशास्त्र ', चौखंबा–संस्कृत–सीरीज, पान ७१.—पुढील उल्लेखांतून याच प्रतीचा उल्लेख केला आहे.

आजपर्यंत ओळखलें नाहीं हें मात्र आश्चर्य आहे.

'रस' हें तत्त्वहि नाट्यशास्त्रांतच नव्यानें आलें आहे असें नाहीं. आयुर्वेदांतहि रसाचें महत्त्व आहे. नाट्यशास्त्रांतील प्रत्येक वस्तू ही काव्यार्थ आहे, तशी आयुर्वेदांत प्रत्येक वस्तू 'औषध' आहे व वैद्यानें तिचा 'युक्ति' व 'अर्थ' लक्षांत घेऊन उपयोग केला पाहिजे. असा उपयोग केल्यास त्या औषधींमधील अव्यक्त रस, वीर्य, विपाक व (ओजस्) यांचा प्रभाव शरीरावर घडतो, म्हणजेच रसादि अभिव्यक्त होतात व आपलें कार्य करतात.[४]

## रसांची अभिव्यक्ति कशी होते ?

आतां काव्यार्थगत अव्यक्त आणि बीजरूप नाट्यरस कोणत्या कारणामुळें व कोणत्या क्रमानें अभिव्यक्त होतात तें पाहूं.

प्रथमच भरतांनीं असें म्हटलें आहे कीं, रसनिष्पत्ति ही एका संयोगाचें फळ आहे. या संयोगाच्या कल्पनेंत नाट्याच्या विविध अंगांची किंवा व्यापारांची कालदृष्ट्या एकरूपता भरतांनीं लक्षांत घेतलेली आहे. नाट्यांतील संवाद किंवा वाङ्मय, अभिनय व त्यांनीं प्रगट झालेली (आजच्या परिभाषेंतील) मानसिक नाट्यसृष्टि या साऱ्यांचा वेगवेगळा विचार न करतां एकदमच विचार करावा लागतो. हीच गोष्ट जमेस घेऊन भरतांनीं गृहीत धरलें आहे कीं 'रसा'ची उत्पत्ति ही या नाट्यघटकांच्या संयोगामुळेंच होते.

संयोगाची भूमिका एकदां घेतल्यावर हा संयोग ज्यांचा ज्यांचा होतो त्या 'पदार्थां'चें वर्गीकरण व वर्णन भरतांनीं केलें आहे व काव्यार्थाशीं प्रत्येक 'क्रिये'चा संबंध जोडला आहे. यांत पदार्थ व 'क्रिया' अशा दोन गोष्टी मी घेतल्या आहेत. त्या स्वरूपतः वेगवेगळ्या आहेत असें मात्र नाहीं. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानांत व एकंदर विचारांतच 'पदार्थ' व त्याची 'शक्ति' व 'क्रिया' यांना एकरूप समजण्याची प्रवृत्ति आहे. उदाहरणार्थ, सत्त्वगुणी मनुष्यांत सत्त्वगुण हा 'पदार्थ' असतो, सात्त्विक 'प्रवृत्ति' व 'क्रियाशक्ति'देखील असते, असें मानलें जात असें. 'नाट्यशास्त्रां'तच पाहिलें तर ज्यामुळें 'बहवोऽर्था विभाव्यन्ते' ते विभाव असें म्हटलें आहे. म्हणजे 'विभाव' हे नाट्यविषयहि आहेत व त्यांचेंच स्वरूप 'विभावन'-क्रियात्मकहि आहे. पुढें 'भाव' शब्दाच्या बाबतींत हा मुद्दा जास्त स्पष्ट होईल. तूर्त नाट्यशास्त्रांतील मुख्य वर्गीकरणाचा विचार करूं.

काव्यार्थगत रसांच्या अभिव्यक्तीसाठीं लागणाऱ्या घटकांचे मुख्य असे तीन वर्ग भरतांनीं मानले आहेत.

१ वाक्, अङ्ग, सत्त्व, अभिनय (नाट्यशास्त्र, पा. ७९)

२ विभाव, अनुभाव

३ स्थायी (८), व्यभिचारी (३३) व सात्त्विक (८) असे एकंदर ४९ भाव.

यांपैकीं प्रत्येक वर्गाचा वेगवेगळा विचार करूं.

## 'वाक्, अङ्ग, सत्त्व, अभिनय'

नाट्यामध्यें वाक् व अङ्ग हीं साधनरूप आहेतच. 'सत्त्व' म्हणजे मन पण आजच्या अर्थानें नव्हे. 'सत्त्व' म्हणजे समाहित किंवा तन्मय झालेलें व साम्यावस्थेंत असलेलें मन. मुद्दाम एखादी गोष्ट किंवा रागद्वेषादि विकारांनीं हेलावणारें मन म्हणजे सत्त्व नव्हे, तर 'सत्त्व' हें मनाचें अधिकृत स्वरूप आहे व अशा 'सत्त्वा'ची परदुःखादि गोष्टींनीं प्रभावित होण्याची सहजप्रवृत्ति असते असें भरतांनीं मानलें आहे. या 'सत्त्वा'मुळें नाट्यांतील केवळ नाट्यधर्मी अशा सुखदुःखांचा परिणामहि नटाच्या खऱ्या 'स्तंभा'नें, अश्रुपातानें किंवा 'प्रलया'नें प्रगट होतो व यामुळें रसोत्कर्ष उत्कट होऊं शकतो. 'नाट्यं सत्त्वे प्रतिष्ठितम्' अशी सत्त्वाची महती भरतांनीं गायिली आहे व 'सत्त्वातिरिक्त अभिनय' हा श्रेष्ठ गणला आहे (नाट्यशास्त्र पान २६९). गणपतराव जोशी यांच्या सारखे नट 'बेभान' होऊन भूमिका वठवीत असत याचा

---

४ प्रा. एस्. एन्. दासगुप्त यांच्या 'हिस्टरी ऑफ इंडियन फिलॉसफी', भाग २, पानें ३५७ ते ३६६ पहा.

अर्थ त्यांचा अभिनय त्यांच्या ' सत्त्वा 'पासून निवत असे. हाच अनुभव भरतांनीं वरील सूत्रांत मांडलेला आहे.

वाक्, अङ्ग व सत्त्व याखेरीज अभिनय हा एक घटक आहे. ही नाट्यांतील क्रिया आहे. पण काव्यार्थाला प्रगट होण्यास वाक्, अङ्ग व सत्त्व याप्रमाणेंच अभिनयक्रियेचें साहाय्य हवेंच. ' वागङ्ग-सत्त्वाभिनय ' यांनीं युक्त किंवा यांचा आश्रय करणारे ते काव्यार्थ असें भरतांनीं वारंवार म्हटलें आहे. अभिनयाच्या स्पष्टीकरणाची जरुरी नाहीं.

## विभाव आणि अनुभाव

वरील चार घटकांमुळें काव्यार्थीचें प्रगटीकरण होऊं शकेल. पण त्यासाठीं या चारी घटकांचें नाट्यांतच प्रभावी कार्य झाल्याशिवाय नाट्यरसांची अभिव्यक्ति होणार नाहीं. त्यासाठीं ' वागङ्ग-सत्त्वाभिनय ' यांचे ' कारण, हेतु किंवा निमित्त ' स्पष्ट करणाऱ्या घटकांची गरज आहे. अशा घटकांना विभाव म्हटलें आहे. शकुंतलेचा नुसता प्रणयानुरूप अभिनय, भाषणें व अंगविक्षेप हीं नाट्यांत पुरत नाहींत. तर, प्रणयानुकूल वातावरणहि जरूर असते. अमुकअमुक गोष्टीमुळें शकुंतलेची प्रणयाकुल अवस्था झाली आहे अशी कारणपरंपरा नाटकांतच दिसावी लागते व अभिनयाची सहेतुकता व सार्थता सिद्ध व प्रत्यक्ष व्हावी लागते. कादंबरीमध्यें हें वर्णनांनीं साधतां येतें पण नाटकांत सर्वच रंगभूमीवर दाखवावें लागतें. ज्या कारणपरंपरेमुळें अभिनयादिकांचें विशेष ज्ञान होतें त्या कारणांनाच ' विभाव ' म्हटलें आहे.

'अनुभाव' हे अभिनयाला प्रत्यक्ष व प्रभावी होण्यास मदत करणारे नाट्यधर्मी विकारप्रदर्शन असतें असा भरतांचा अभिप्राय दिसतो. उदाहरणार्थ, रति हा भाव घेतला तर स्मितवचनादि व्यापारांमुळें त्याचा अभिनय जास्त प्रत्यक्ष होणें स्वाभाविक आहे. " अभिनयेत् अनुभावैः " असें भरतांनीं ठिकठिकाणीं म्हटलें आहे. यावरून अनुभाव म्हणजेच अभिनयाची प्रत्येक भावानुसार विकारदर्शनात्मक अभिव्यक्ति असा अर्थहि लागतो.

अनुभाव व विभाव हे दोन्ही नाट्यधर्मीच आहेत, पण त्यांना भरतांनीं मुद्दाम ' लोकयात्रानुयायिनः ' ' लोकस्वभावोपगत ' अशीं विशेषणें लावलीं आहेत. याचें कारण उघड आहे कीं, अभिनयामध्यें व्यक्त होणारे अनुभाव व विभाव हें जरी नाट्यधर्मी असले तरी त्यांचें स्वरूप गूढ नाहीं. उलट ' लोकधर्मी ' कारणपरंपरा व विकार-प्रदर्शन यांचें अनुकरण विभाव व अनुभाव यांमध्यें साधलें जातें. पण ' लोकधर्मी ' वास्तवाचें असें अनुकरण ' भाव ' या ' अ-लौकिक ' प्रमेयरूप पदार्थांच्या बाबतींत घडत नाहीं, हेंच भरतांना सुचवावयाचें आहे, ही गोष्ट लक्षांत येईल.

## ' भाव ' म्हणजे काय ?

अभिनयानें आणि विभावानुभावांनीं काव्यार्थगत रसाच्या अभिव्यक्तीची तयारी झाली, पण केवळ यांनींच रसनिष्पत्ति होणें शक्य नाहीं. त्यासाठीं ' भावां 'चाहि परिपोष झाला पाहिजे असें भरतांनीं मांडलें आहे. आज सिंधूच्या अभिनयामुळें करुणरस व शोक हा स्थायी भाव उत्पन्न होतो, असें आधुनिक प्रेक्षक मानतो व सरळ अनुभवितोच ! मग केवळ अभिनयामुळें रसनिष्पत्ति होणें अशक्य असें भरतमुनि कां मानतात ? मध्येंच ' भावा 'ची आज अनावश्यक वाटणारी बाब भरतमुनींनीं कां आणली ? हा खरा प्रश्न आहे.

या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं ' लोकधर्मी ' वास्तवसृष्टीचा आधार सोडून केवळ नाट्यसृष्टीकडेच आपल्याला वळलें पाहिजे व ती नाट्यसृष्टीदेखील आधुनिक नसून प्राचीन आहे हें पक्कें लक्षांत वागविलें पाहिजे. तरच ' भावां 'चें कोडें उलगडतां येईल. आतांपर्यंत नाट्यशास्त्रांतील ' भावां 'चा ' लोकधर्मी मनोविकारां 'शीं, मॅक्डूगल-शॅन्ड-प्रभृतींच्या भावना-मंडलांशीं समीकरणच जोडण्याचा प्रयत्न केला गेला आहे. पण त्यांत यश न येतां उलट मतमतांतरेंच झालीं आहेत. याचें कारण, माझ्या मतें, हा अन्वयच लागत नाहीं.

नाट्यशास्त्रांत किंवा एकंदरीनें भारतीय कलास्वरूपशास्त्रांतच आधुनिक अर्थानें ' इमोशन्स 'चा विचार नाहीं ही गोष्ट समजावून घेण्यासाठीं ' भाव ' या शब्दाचा अभिप्राय प्राचीन भारतीय संदर्भानेंच समजून घेतला पाहिजे. पुढील चर्चेंत मी ही गोष्ट तपशीलवार मांडली आहे.

येथेंच एक गोष्ट सांगणें जरूर वाटतें कीं मम्मटासारख्या अकराव्या शतकांतील टीकाकारानेंदेखील ' भाव ' म्हणजे मानवी मनोविकार असा अर्थ लावलेला नाहीं. ' काव्यप्रकाश 'च्या चौथ्या प्रकरणांत त्यांनीं म्हटलें आहे : ' न ताटस्थ्येन नात्मगतत्वेन रसः प्रतीयते नोत्पद्यते नाभिव्यज्यते अपि तु काव्ये नाट्ये चाभिधातो द्वितीयेन विभावादिसाधारणीकरणात्मना भावकत्वव्यापारेण भाव्यमानः स्थायी सत्त्वोद्रेकप्रकाशानन्दमयसंविद् विश्रान्तिसतत्त्वेन भोगेन भुज्यते । ' रसिकाला ' ताटस्थ्य ' किंवा कलात्मक ' समाधि ' लाभून किंवा 'आत्मगतत्वा'मुळें भावनांचा स्वानुभव लाभून रसनिष्पत्ति होते, ही आधुनिक मानसशास्त्रीय उपपत्ति या ठिकाणीं स्पष्टपणें निषिद्ध मानली आहे व अभिधा, भावकत्वव्यापार आणि भोग या तीन पायऱ्यांनीं रसाची उत्पत्ति, अभिव्यंजना व प्रतीति होते असें स्वच्छ प्रतिपादन या टीकाकारांनीं केलें आहे. ' भोग ' किंवा कलात्मक रसास्वाद शक्य होण्यापूर्वीची पायरी म्हणजे भावकत्वव्यापार. हा व्यापार झाल्यानें काव्यांतील अभिधेनें ( शब्दार्थानें ) सूचित पण अव्यक्त राहिलेला रस ' स्थायी भाव ' या रूपांत अवतरतो व मग त्या स्थायी भावाला व्यक्त रसाचें रूप येतें, असाच या प्राचीन टीकाकारांचा अभिप्राय आहे. ( ' भाव ' या शब्दाचा प्राचीन अर्थ व मराठी अर्थ यांतील तफावतीचा विचार करतांना उपयुक्त ठरेल अशी थोडी चर्चा 'महाराष्ट्र साहित्यपत्रिके'च्या ऑक्टोबर १९५०च्या अंकांत " भगवद्गीतेंतील ' भाव ' " या लेखांत मी केली आहे ती पहावी. )

भरतमुनिप्रणीत ' भाव ' हे कवीचे किंवा रसिकाचे भाव ( इमोशन्स ) नाहींत याला पुरावाच हवा तर ' कवेरन्तर्गतं भावं भावयन् भाव उच्यते ' या प्रसिद्ध सूत्रांतच आहे. घाईघाईनें आणि वरवर अर्थ लावला तर ' भाव ' म्हणजे कवीचे अंतर्गत भाव असें म्हणून त्या सूत्रांतूनच नाट्यशास्त्राच्या आधुनिक संस्करणाला उपयोगी अर्थ काढतां येतो. पण खरा अर्थ काय आहे ? त्या सूत्रांत ' भाव ' हा शब्द दोनदां आला आहे. एकदां ' कवेरन्तर्गतं भावं ' म्हटलें आहे. दुसऱ्या वेळीं आलेला 'भाव' शब्द नाट्यशास्त्रांतील ' भाव ' हा पदार्थ आहे. सूत्राचा खरा अर्थ असा आहे कीं रति, शोकादि नाट्य-'भाव' हे कविमनांतील भावार्थांचें, म्हणजेच पर्यायानें, **काव्यार्थांचें भावन** करतात. या सूत्रांच्या वरच भरतांनीं असें स्पष्ट म्हटलेंहि आहे कीं, " किं भावयन्ति भावाः ? उच्यते—वागङ्गसत्त्वोपेतान् काव्यार्थान् भावयन्तीति भावाः " ( पान ७९ ).

भरतमुनींच्या नाट्यशास्त्रांतील ' भाव ' हे काव्यार्थांना ' भावित ' करतात हें आतांपर्यंत आपण पाहिलें. अर्थात हे ' भाव ' म्हणजे आजच्या अर्थानें मनोभावना नाहींत एवढें समजण्यास वरील दोन सूत्रेंच पुरेशीं आहेत.

## भाव शब्दाचा मराठी अर्थसंकोच

भरतप्रणीत नाट्यशास्त्रांतील ' भाव ' ह्या संज्ञेचा अर्थ व मराठींत ' भाव ' ह्या शब्दाचा आलेला अर्थ यांतील तफावत लक्षांत येणें माझ्या एकंदर विवेचनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. म्हणून या तफावतीची थोडी मीमांसा येथें करणें मला आवश्यक वाटतें.

संस्कृतमधून आणि नंतर फारशी वगैरे भाषांतून मराठीनें अनेक शब्द घेतले आहेत; पण अनेकदां ह्या उसनवारीच्या वेळीं मूळ संज्ञेच्या अर्थाचा विस्तार किंवा संकोच मराठीनें केलेला आढळतो. मागें ' काव्यार्थ ' या संज्ञेच्या चर्चेच्या वेळीं मी या मुद्द्याला नुसता स्पर्श केला होता. परंतु आतां जास्त तपशीलांत शिरणें जरूर आहे.

परकीय शब्दांच्या अर्थविस्ताराचीं अनेक उदाहरणें देतां येतील. पीतांबर हा शब्द घ्या. मुळांत पिवळें वस्त्र अशा मर्यादित अर्थाचा हा शब्द मराठींत सर्वच रंगांच्या रेशमी वस्त्रांना लागूं लागला. तसाच ' कर्म ' हा शब्द घ्या. विश्वांतील घडामोडींना कारण असणारें एक अव्यक्त परंतु शक्तिरूप असें ' कर्म ' म्हणजे भारतीय तत्त्वविचारांतील विशिष्ट अर्थवाचक एक शब्द आहे. पण मराठींत कर्मांचा हा पारिभाषिक अर्थहि राहिला आणि शिवाय साध्या प्राकृत कृतींनाहि ' कर्म ' हा शब्द लागूं लागला. ( किंबहुना ' कर्म ' शब्दाचा हा अर्थविस्तार भगवद्गीतेच्या काळींच सुरू झालेला

दिसतो. ) 'गुण' हा शब्दहि मुळांत सत्त्व, रज व तम या त्रिगुणांना लागत होता पण पुढें संस्कृत-मध्येंच त्याचा अर्थविस्तार झाला व मराठींत ह्या विस्तृत अर्थानेंच तो शब्द घेतला गेला.

अर्थविस्ताराचीं जास्त उदाहरणें नकोत. कारण 'भाव' शब्दाचा अर्थविस्तार झाला नसून अर्थ-संकोच झाला आहे व त्याचीच आपल्याला तूर्त चर्चा करावयाची आहे. साधारणतः परकीय शब्दांचा असा अर्थसंकोचच झालेला आढळतो. उदाहरणार्थ 'शायर' हा शब्द घ्या. मूळ अर्थ कवि असा असून मराठींत शाहीर म्हणजे फक्त भाट-काव्यें ( पोवाडे ) म्हणणारा कवि असा मर्यादित किंवा संकुचित अर्थ रूढ झाला आहे. पक्वान्न हा दुसरा शब्द घ्या. सर्वच शिजविलेल्या अन्नाला हा मूळ शब्द लागत होता. पण मराठींत तो फक्त जेवतांना खाण्याच्या मिष्टान्नांना लागूं लागला.

साध्या वापरांतील अर्थसंकोचाचीं हीं उदाहरणें सोडून आतां आपण 'कल्पना', 'भावना' वगैरे शब्दांकडे वळूं. 'कल्पना' हा शब्द मुळांत 'क्लृप्' धातूपासून झालेला आहे व 'क्लृप्' हा धातूहि 'कृप्' या मूळधातूपासून 'क' चा 'ल' होऊन बनला आहे. 'कृप' व 'क्लृप' यांचा धात्वर्थ, कोणत्या तरी बाह्य वस्तूंत शिरून तिला आपल्या सामर्थ्यानें समर्थ करणें किंवा सिद्ध करणें असा आहे. 'कल्प' म्हणजे 'रचना' असा अर्थ यामुळेंच साधित झाला आहे. अर्थात् या रचनेंत रचना करणारा कोठल्या तरी वस्तूंत अनुप्रवेश करून तिला जणूं काय जन्मास घालतो असाहि विलक्षण अर्थ आहे. 'कल्प' याचा अर्थ वस्तूची अशी नवनिर्मिति असा झाल्यामुळें औषधींचा 'कल्प', कायाकल्प, कल्पतरु वगैरे शब्दप्रयोग संस्कृतमध्यें आढळतात.

परंतु 'कल्प' म्हणजे निर्मिति व रचना हा विस्तृत अर्थ संस्कृतमध्यें असला तरी मराठींत 'कल्पना' याचा अर्थ फक्त मनानें निर्माण केलेल्या वस्तु, असा मर्यादित झाला. या संकोचा-मुळें 'कपोलकल्पित' या शब्दाची कशी गंमत झाली आहे पहा! मूळ संस्कृत अभिप्राय ध्यानांत ठेवून पाहिलें तर कपोलानें कल्पित म्हणजे नुसती तोंडानें निर्मिलेली. अर्थात ज्या वस्तूंच्या रचनेची पोकळ बडबडच झाली आहे अशी वस्तू, असा चांगला अर्थ 'कपोलकल्पिता'ला होता. पण मराठींत 'कल्पित' म्हणजे फक्त मनानें कल्पित ठर-ल्यामुळें कपोलानें कल्पित म्हणजे काय, असा प्रश्न उभा राहतो व या सुंदर शब्दाला मराठींत अर्थहीनत्व प्राप्त होतें.

कल्पनेनंतर 'शील' हा शब्द घेऊं. या शब्दाचा अर्थ वस्तूची 'मूळ रचना' असा होता. भरतांनीं नाट्यशास्त्रामध्यें ( अध्याय २४, श्लोक ९३ ) स्त्रियांच्या नानाप्रकारच्या शीलांचा उल्लेख करून मग गंधर्वशीला, नागशीला, अश्वशीला वगैरे प्रका रांचें वर्णन दिलें आहे. हीं वर्णनें शारीरिक आणि मानसिक अशा संमिश्र गुणदोषांचीं आहेत. यांवरून स्पष्ट दिसतें कीं 'शील' म्हणजे शारीरिक व मानसिक असे अंगभूत गुणदोष व त्यामुळें लाभलेली आकृति, प्रकृति व स्वभाव असा व्यापक अर्थ भरतांच्या काळीं रूढ होता. पण हाच शब्द पुढें केवळ मानसिक प्रकृतीला लागूं लागला आणि मराठींत तर केवळ नैतिक अशा प्रकृतीलाच आपण 'शील' म्हणूं लागलों.

'कल्प' व 'शील' यानंतर 'भाव' हा शब्द घेऊं. 'भाव' शब्द 'भू' धातूपासून आहे व सर्वच वस्तूचें 'होणें' किंवा आपल्या अस्तित्वाची शक्ति दाखविण्यास समर्थ बनणें असा 'भू' चा मूळ अर्थ आहे. 'भव', 'अभाव', 'प्रभाव', 'भावना' वगैरे सर्वच शब्दांचें एक कुटुंब आहे व अर्थाच्या दृष्टीनें सर्वांचा एकच तोंडवळा आहे.

'भाव' म्हणजे शक्तिरूपानें समर्थ असा एखाद्या वस्तूचा भाव, म्हणजेच वस्तूच्या अंगभूत असलेली आणि विशिष्ट प्रक्रियेनें कार्यप्रवृत्त होणारी शक्ति. सर्व वस्तुमात्रांतील या भावरूप शक्तींचें तत्त्वच भारतीय तत्त्वज्ञानांत भव ( शंकर ) आणि भवानी ( मायास्वरूपी पार्वती ) या दैवतमिथुनानें सगुण व प्रत्यक्ष करण्यांत आलें आहे.

पण इतक्या व्यापक अर्थाची 'भाव' ही संज्ञा मराठींत फक्त मनाच्या 'भावनां'ना लावण्यांत

येऊं लागली आहे. 'मनोभावना' तेवढ्याच भावना, आणि अचेतन वस्तूंना 'भावना'च नसते असा मराठीचा अभिप्राय आहे. सारांश, जुना संस्कृत अर्थ मराठींत उरलेला नाहीं; उरला तो फक्त कोठें तरी अवशेषरूपानें. उदाहरणार्थ, मराठी कवितेचा 'भावार्थ' अजून शिल्लक आहे आणि क्षयरोगाची 'भावना' अमक्याच्या शरीरांत झाली आहे असे म्हणतांना आजचा वैद्यहि जुनीच 'भावना' अनुलक्षून बोलत असतो.

कल्पना, शील आणि भाव या तिन्ही शब्दांचा अर्थसंकोच आपण पाहिला. त्यांत एक सामान्य तत्त्व आहे. या संस्कृत शब्दांचा मूळचा अर्थविस्तार अचेतन आणि सचेतन यांना व्यापणारा होता, परंतु मराठीनें अचेतनांना वगळून हे शब्द फक्त सचेतनांपुरते संकुचित केले आहेत. सचेतनांच्या, विशेषतः मानवी मनाच्या, क्रियांना अचेतनांपासून तोडून, वेगळें करून त्यांना वैशिष्ट्यपूर्ण समजणें, ह्या सामान्य प्रवृत्तीचीच परिणति ह्या अर्थसंकोचांत झाली आहे व तत्त्वविचारांच्या इतिहासांत या विकासाला फार महत्त्व आहे. पण तो विषय प्रस्तुत निबंधांत येत नाहीं. 'भाव' या शब्दापुरती संस्कृतमधून मराठींत झालेल्या भाषांतरक्रमांतील केवळ तफावत समजावून घेणें येथें प्रस्तुत होतें.

'भावना' म्हणजे रागशोकभयादि मानवी-विकार ('फीलिंगज्', 'इमोशन्स्' वगैरे) नाहींत ही गोष्ट 'भाव' शब्दाचा खरा अर्थ पाहिला म्हणजे तर कळतेच. शिवाय, भावना आणि मनोविकार यांचें समीकरण चूक असल्याचा दुसरा पुरावा असा कीं, पारिभाषिक चर्चेंत सर्व मनोविकारांना 'वेदना' हा शब्द प्राचीन काळीं वापरीत असत. इंद्रियज्ञानात्मक, सुखदुःखात्मक किंवा रागद्वेषात्मक अशा सर्वच तऱ्हेच्या मानसिक प्रतिक्रियांना 'वेदना' हा शब्द तेव्हां वापरला जात असे. मराठींत या शब्दाचा वापर फक्त दुःख-वेदनेपुरताच मर्यादित झाला आहे खरा; पण त्या शब्दाचा मूळ विस्तार मोठा आहे. आधुनिकांनीं भरतांच्या नाट्यशास्त्रावर लादलेला मानसशास्त्रीय प्रपंच जर यथार्थ असता तर तो शब्दच भरतमुनींनींहि वापरला असता आणि रस किंवा भाव हे संवेदनात्मक आहेत असें खासच म्हटलें असतें. आपण भरतप्रणीत नाट्यभावांच्या विवेचनाकडे आतां वळूं.

## 'भाव' हे 'कारणसाधन' आहेत

"काव्यार्थांना भावित करणारे ते 'भाव'" या सूत्राचा अर्थ आपण आतां पाहिला पाहिजे. त्यासाठीं भरतमुनींच्यापुढें प्रश्न कोणता होता तें नीट ओळखलें पाहिजे. तरच त्यांनीं दिलेलें उत्तरहि आपल्याला उमगूं शकेल. तो प्रश्न असा होता कीं, काव्यार्थ हे पूर्णपणें नाट्यधर्मी आहेत. परंतु त्यांचा प्रभाव पहावा तर प्रत्यक्ष व वास्तवसृष्टींत झालेला दिसतो. नाट्याचें फल असा जो रसोत्कर्ष तो वास्तवच आहे, त्यांत सोंग कांहीं नसतें. पण तो रसोत्कर्ष सोंगांनीं (नाट्यवस्तूंनीं) घडून येतो. हें घडतें कसें ? असा सरळ प्रश्न भरतांनीं पुढें ठेवला व मग 'भाव' या पदार्थांचा सिद्धांत रचला.

त्यांची भूमिका अशी कीं, रसोत्कर्षाला काव्यार्थ हे कारण आहेत. पण काव्यार्थ हे आयुर्वेदांतील 'द्रव्यां'प्रमाणें पराधीन आहेत. काव्यार्थांकडे रसांचें कारकत्व व जनकत्व आहे पण ते नाट्यधर्मी असल्यामुळें स्वतः पराधीन व पंगू आहेत. त्यांना प्रभावी होण्यासाठीं, म्हणजे त्यांचा कार्यसिद्धिकारक भाव प्रकट होण्यासाठीं, 'नाट्यभाव' या पदार्थांची गरज आहे. 'कारणसाधन' हें 'नाट्यभावां'चें विशेषण भरतानीं याच अर्थानें लावलें आहे. रसांचें जें कारण (म्हणजे काव्यार्थ) त्यांचें साधन 'भावां'मुळें होतें. 'साधन' याचा अर्थ या ठिकाणीं सिद्धता, पराधीनतेचें निराकरण, असा पारिभाषिकच घेतला पाहिजे.

सुश्रुतप्रणीत आयुर्वेदीय प्रक्रियेचा सिद्धान्त याबाबतींत पाहण्यासारखा आहे. सुश्रुताच्या मताप्रमाणें 'औषधकर्में' 'वीर्यप्राधान्या'मुळें शरीरावर वेगवेगळे प्रभाव गाजवितात. हें वीर्य औषधींना कसें प्रभावी करतें ? तर "एतानि खलु वीर्याणि स्वबलगुणोत्कर्षात् रसं अभिभूय आत्मकर्माणि कुर्वन्ति" (प्रा. दासगुप्तांचा वर उल्लेखिलेला ग्रंथ, पानें ३६१ व ३६२, तळटीपा पहा). यांत द्रव्यें किंवा औषधी ह्या काव्यार्थांप्रमाणें, वीर्यें ही 'नाट्यभावां'प्रमाणें व 'रस' हा नाट्यरसांप्रमाणें

असे समांतर सिद्धान्त आयुर्वेद व नाट्यवेद यांमध्यें आपल्याला दिसतात.

'भाव इति कारणसाधनं' या भरतसूत्राचा अर्थ आणखी स्पष्ट होणें जरूर आहे. याची जाणीव भरतांनाहि झाली म्हणून त्यांनींच असें स्पष्टीकरण केलें आहे कीं, ज्याप्रमाणें सर्व वस्तुजात हें आप्, पृथ्वी इत्यादि पंचमहाभूतात्मक आहे व रस-गंधादि गुणांनींच 'भावित' आहे. त्याप्रमाणें काव्यार्थदेखील नाट्यभावांनींच भावित म्हणजे 'वासित' किंवा 'कृत' आहेत. भरतांनीं घेतलेल्या दाखल्यावरून 'भावित' या पदाचा अर्थ अगदीं स्पष्ट होतो, तो असा कीं, काव्यार्थांना 'कृत' किंवा 'वासित' असें आस्वाद्य किंवा ग्रहणयोग्य रूप भावामुळें येतें. हाच मुख्य मुद्दा भरतांना सांगावयाचा आहे.

एकदां 'भाव' हे प्रमेयरूप पदार्थ मानले कीं मग रसनिष्पत्तीची उपपत्ति सांगणें भरतांना सहज शक्य झालें. याचा अर्थ असा नव्हे कीं, भरतांनीं केवळ आपल्या सोयीसाठीं 'भाव' हे पदार्थ कपोलकल्पित मानले. नाट्यभाव व नाट्यरस या दोन्हींची भरतांनीं मांडणी केली ती कपोलकल्पित नाहीं. ती परंपरागत आहे. 'इति स्मृताः' असें भरत या बाबतींत म्हणतात त्याचा अर्थच असा कीं एका प्राचीनतम परंपरेकडे ते बोट दाखवीत आहेत. परंपरेची ही बाब लक्षांत घेतल्याशिवाय भरतप्रणीत 'रसभावविकल्पना' चा अर्थच लागणार नाहीं, आणि ही गोष्टच माझ्या या निबंधाच्या पुढील उत्तरार्धांत मी मुख्यतः मांडणार आहे.

---

## जिवंत मराठी [पान १४ वरून पुढें चालू]

भाकरी अन् कोरड्यास खाल्लें पाहिजे, त्यांच्याशीं समरस झालें पाहिजे, त्यांच्याबरोबर आसवें गाळलीं पाहिजेत. आढ्यतेनें व ताठरपणानें किंवा फसव्या कृत्रिम विनीत भावानें त्यांच्यांत न मिसळतां खुल्या दिलानें आणि आपलेपणानें त्यांच्यासमोर गेलें पाहिजे. म्हणजे त्यांचा आत्मविश्वास वाढेल, त्यांना त्यांच्या जीवनांत स्वारस्य आढळेल. आमचा अहंगंड आम्हीं टाकला म्हणजे साहजिकच त्यांचा न्यूनगंड कमी होईल; मग आमची 'इंग्रजी' मराठी त्यांनीं उचलून घेण्याऐवजी आम्हीं त्यांची जिवंत मराठी पूर्वींप्रमाणें घेऊन येऊ व या जिवंत मराठीची भर घालून आमच्या भाषेला, वाङ्मयाला समृद्ध करूं.

---

श्री. माधव मनोहर

# प्र ता र णा

एक...दोन...तीन...

दिवाणखान्यांतल्या भिंतीवरच्या जुन्या घड्याळांत सावकाश ठोके पडूं लागले.

ठोके पडूं लागतांच दोघांहि म्हाताऱ्यांनीं एकदम घड्याळाकडे पाहिलं. दोघांचेहि ओठ हलले. जणूं काय त्यांच्या ओठांशीं कांहीं शब्द घुटमळत होते. जणूं काय, ठोके पडण्याची वाट पाहतच इतका वेळ ते आरामखुर्च्यांवर पडले होते; दिव्याच्या प्रकाशांत धूम्रवलयं सोडून त्यांकडे पाहत कसा तरी वेळ घालवीत होते.

किती वाजले असणार, हें त्यांना माहीत होतं. आणि माहीत नसलं तरी घड्याळाकडे पाहतांच ते त्यांना कळलं असलं पाहिजे. पण तरीहि दोघेहि नकळत ठोके मोजीत होते !

...आठ...नऊ...दहा.

'दहा वाजले !' दोघांच्याहि तोंडून एकदम एकच उद्गार बाहेर पडला.

"बरोबर याच वेळीं "...पहिल्या म्हाताऱ्यानं कांहीं तरी बोलायचें म्हणून बोलायला सुरुवात केली.

"ताई ओवाळणीचं साहित्य घेऊन येत असे" दुसऱ्या म्हाताऱ्यानं पहिल्याचं वाक्य पुरं केलं.

"—आणि आईबापांच्या तसबिरीला माळ घालून..."

"...नीरांजनानें ओवाळीत असे—"दुसऱ्या म्हाताऱ्यानं पहिल्याचं वाक्य पुन्हां पुरं केलं.

दोघांच्याहि वृद्ध डोळ्यांसमोरून त्यांच्या ताईच्या भावपूजेचं चित्र सरकत होतं.

"सुशिक्षित स्त्रीचा हा भोळा भाव पाहून तिचे पतिराज तिची थट्टा करीत."—किडकिडीत रावसाहेबांनीं ताईच्या पतीकडे पहात आठवण केली.

"तेव्हां तिचे सुधारक भावजी तिचं मोठ्या आवेशानं समर्थन करीत !" भय्यासाहेब म्हणाले.

थोडा वेळ दोघंही थांबले. जुन्या सुखद आठवणींनीं दोघंहि क्षणभर व्याकुळ झाले होते.

"गेल्या वर्षीं याच वेळीं, राऊ..."

"...ताईनं आपणा दोघांनाहि ओवाळलं होतं, भय्या."...

"गेल्या वर्षाप्रमाणंच..."

"गेलीं तीस वर्षे !"

पुन्हां दोन्ही म्हातारे थांबले. भय्यासाहेबांनीं आपल्या चिरुटाची राख रक्षापात्रांत झाडली; आणि रावसाहेबांनीं या हातांतली सिगरेट त्या हातांत चाळवली.

"माझं फक्त एकच वर्ष चुकलं."

"आणि माझंहि पण एकच !"

"मी इंग्लंडला गेलों होतों तेव्हां—"

"आणि मी हॉस्पिटलांत होतों म्हणून."

भय्यासाहेबांनीं क्षणभर डोळे मिटले; रावसाहेबांनीं नाकावरच्या सोनेरी चष्म्याची उगीचच चाळवाचाळव केली.

"पण मीं इंग्लंडहून केबल पाठवली होती तुमच्या दोघांच्या नांवानं."

"आणि मी हॉस्पिटलमधून सुंदर प्रेझेंट पाठवलं होतं."

दोघांचीहि नजर टेबलावरच्या सरस्वतीच्या सुंदर हिमगौर मूर्तीकडे आपोआप वळली.



अनुक्रमणिका





" तुझ्या प्रेझेंट्सनीं तर हा दिवाणखाणा भरून गेला आहे " भय्यासाहेब म्हणाले.

'खरंच कीं काय, पाहूं या' अशा आविर्भावानं रावसाहेबांनीं दिवाणखान्यांत चोहींकडे नजर फिरविली.

" पण माझं एकच प्रेझेंट माझं मलाच आवडतं आणि ताईलाहि ! "—रावसाहेब म्हणाले.

" दिलरुबा ! " भय्यासाहेबांनीं चटकन् ओळखलं. दोघांचीही नजर आपोआप कोपऱ्यांतील दिलरुब्याकडे गेली. होय. तो दिलरुबा अजूनहि तिथेंच होता. पण गेल्या कित्येक महिन्यांत कोणाचींहि बोटं त्याच्या तरल तारांवरून फिरलीं नव्हतीं.

त्या दिलरुब्याच्या स्वर्गीय स्वरलहरींनीं तिघांचेहि जीवभाव हेलावत. त्याच्या स्वरसंगतींत तिघांचेंहि जीवन एक होऊन जाई.

गेल्या वर्षीं याच दिवशीं. तीच भावपूजा— तेंच स्वर्गीय संगीत. तेंच भावमीलन....

दोघांहि म्हाताऱ्यांचे डोळे क्षणभर ओलावले.

त्यांच्या डोळ्यांसमोरून गेल्या तीस वर्षांचा त्यांचा जीवनपट संथपणें सरकत होता.

भय्यासाहेब, त्यांची पत्नी ताई आणि ताईचे भावजी रावसाहेब. कोणत्याहि तीन समवयस्क माणसांचीं मनं इतकीं मिळून गेलीं नसतील. इतका दीर्घ काळ इतक्या परस्पर समजुतीनं व सहानुभूतीनं कोणतेहि समवयस्क स्त्री-पुरुष राहिले नसतील.

—गेलीं तीस वर्षं याच दिवशीं, भय्यासाहेब आणि रावसाहेब यांना त्यांची ताई ओवाळीत असे.

वास्तविक हा दिवस म्हणजे ताईचा वाढदिवस. त्या दिवशीं दिवसा तिच्या वाढदिवसाचा समारंभ होई. मंडळी जमत. घर गजबजून जाई. समारंभाची गडबड दिवसभर चाले.

पण घरांतली गडबड संपली, सर्वत्र सामसूम झालं, म्हणजे या तिघांसाठीं एक खास समारंभ होई.

रात्रीं दहाच्या सुमारास हातांमधें पूजेचं साहित्य घेऊन ताई दिवाणखान्यांत येई. मातापित्यांच्या तसबिरीची पूजा करी आणि मग डोळे मिटून एक मिनिट ध्यानस्थ बसे.

तिच्या ध्यानमग्न, भावपूर्ण मुखाकडे बघून पतिराज म्हणत " कसला आशीर्वाद मागतेस, ताई ? "

" दुसरा कोणता असणार, भय्या ? जन्मोजन्मीं हाच पतिदेव मिळावा ! " रावसाहेब म्हणत.

भय्यासाहेब आणि रावसाहेब यांच्या या थट्टामस्करीकडे ताईचं मुळींसुद्धां लक्ष नसे. तिचे डोळे मिटलेले असत. तिच्या गोऱ्यापान चेहऱ्यावर अपूर्व शांतता व भक्तिभाव दिसे. तिचं मूळचं विस्तीर्ण कपाळ, डोळे मिटल्यावर नि एकाग्र भावना झाल्यावर अधिकच विस्तीर्ण झाल्याचा भास होई.

सुशिक्षित स्त्रीचा हा भोळा भाव बघून भय्यासाहेब तिची थट्टा करीत; पण तिचे भावजी मात्र आपली नास्तिकता क्षणभर विसरून ताईचं समर्थन करण्यास आवेशानं पुढं येत.

आणि मग भय्यासाहेब रावसाहेबांच्या नास्तिकतेची थट्टा करीत. साध्याभोळ्या ताईची भक्ति आणि सुधारक रावसाहेबांची नास्तिकता यांमधें काय फरक आहे, हेंच भय्यासाहेबांना कळत नसे !

आणि याबद्दल मग वाद होई. रावसाहेब खुलासेवार तात्त्विक विवेचन करीत. पण त्यामुळें भय्यासाहेबांच्या डोक्यांत यत्किंचित्‌हि प्रकाश पडत नसे. ताईला मात्र सर्व चटकन् पटत असे.

" तुम्ही दोघेहि सारखेच कवी आहांत झालं ! " अखेर भय्यासाहेब शेरा मारीत.

वास्तविक, वाढदिवसाच्या प्रसंगीं हा ओवाळणीचा प्रकार कसा सुरू झाला, हें गूढच आहे.

बत्तीस वर्षांपूर्वी, भय्यासाहेब आणि ताई यांचा विवाह झाल्यानंतर कांहीं महिन्यांनीं ताईचा वाढदिवस आला. त्या वेळीं ती 'ताई' नव्हती; 'मनोरमा' होती. नवीनच घरीं आलेल्या लाडक्या पत्नीचा पहिलाच वाढदिवस भय्यासाहेबांनीं थाटामाटानं समारंभ केला. मित्रमंडळी बोलावली. पार्टी झाली. ताईवर प्रेझेंट्सचा वर्षाव झाला. नंतर गप्पागोष्टी, हास्यविनोद होऊन मंडळी पांगली.

दहाचा सुमार झाला. भय्यासाहेब जरा थकलेच होते. इतक्यांत पूजेचं साहित्य घेऊन ताई दिवाणखान्यांत आली.

" रमा, अजून तुझं काय बाकी राहिलं आहे ? " भय्यासाहेबांनीं आश्चर्यानं विचारलं.

## प्रतारणा

" दिवसभर झाला तो समारंभ लोकांसाठीं; आतां खास आपल्यासाठीं. " ताईनें उत्तर दिलें.

" घरीं असतांना मी वाढदिवसाच्या दिवशीं आई-बाबांना ओवाळीत असे. आणि माझ्या दादालाहि. आई-बाबा आशीर्वाद देत. दादा ओवाळणी टाकी. आज आईबाबांच्या तसबिरीला ओवाळीन; आणि नंतर तुम्हांला. "

आणि भय्यासाहेबांच्या उत्तराची वाट न पाहतां ताईनं तसबिरीला फुलं वाहिलीं. नीरांजन ओवाळलं आणि डोळे मिटून आशीर्वादासाठीं कांहीं क्षण ती ध्यानस्थ बसली.

तिच्या त्या ध्यानमग्न, शान्त मूर्तीकडे पाहून, भय्यासाहेबांच्या मिष्किल चेहऱ्यावरचं हंसूं क्षणभर जागच्या जागींच जिरलं. " कसला आशीर्वाद मागते आहेस रमा ? " एवढंच त्यांनीं विचारलं.

कांहीं क्षणांनंतर मनोरमेनं डोळे उघडले आणि पतीकडे पाहिलं. आणि " रमा, हें काय ' " असं भय्यासाहेब म्हणत आहेत एवढ्यांत, रमानं त्यांच्या कपाळावर टिळा लावला आणि त्यांना ओवाळलं. मग शान्तपणानं ती म्हणाली, " तुम्हांला तें कळायचं नाहीं. "

यावर कांहीं तरी बोलायचं म्हणून भय्यासाहेब म्हणाले, " पण आज तुझा दादा नाहीं ओवाळून घ्यायला ? "

अन् पुढच्या वर्षीं ओवाळून घ्यायला एक नवीनच दादा आला ! त्याचं नांव रावसाहेब. या नव्या दादानं पहिल्याच दिवशीं मनोरमेला ताई बनवून टाकलं !

तेव्हांपासून सर्वजण मनोरमेला ताईच म्हणूं लागले. खुद्द भय्यासाहेबदेखील रमाऐवजीं ताई म्हणूं लागले. एखाद्या वेळीं गंमत म्हणून ते ' रमा–ताई ' असा संधीहि करीत.

आणि ताईचा वाढदिवस पुन्हां आला.

त्या दिवशीं सर्व मंडळी गेल्यानंतर दिवाणखान्यांत झालेल्या खास समारंभांत दोघांऐवजीं तीन माणसं होतीं. भय्यासाहेब, त्यांची 'ताई' आणि ताईचे भावजी.

आणि जेव्हां ताईनं तसबिरीची पूजा करून आशीर्वाद मागितला, तेव्हां भय्यासाहेबांनीं गेल्या वर्षाप्रमाणें ओठांवरचं हंसूं दाबलं नाहीं. नास्तिक प्रोफेसरसाहेबांच्या चेहऱ्यावर मात्र कौतुकाचा नि सहानुभूतीचा भाव स्पष्ट उमटला.

आपल्या अंतरात्म्याची भाव जाणणारी एक व्यक्ति आज आहे, अशी ताईची मनोमन साक्ष पटली होती.

भय्यासाहेबांना ओवाळल्यावर ते म्हणाले, " रमाताई, गेल्या वर्षीं ओवाळून घ्यायला दादा नव्हता. यंदा आहे म्हटलं."

आणि मग ताईनें एक शब्दहि न बोलतां, तिच्या भावजींना मोठ्या प्रेमानं ओवाळलं.

तेव्हांपासून सतत तीस वर्षें ताईच्या वाढदिवसाचा हा खास कार्यक्रम अबाधित चालूं राहिला. त्यांत पुढच्या वर्षीं फक्त एकच फरक पडला. तो म्हणजे हा सर्व कार्यक्रम आटोपल्यानंतरचं ताईचं दिलरुबावादन !

ताईची संगीतलुब्धता पाहून प्रोफेसर-भावजींनीं वाढदिवसाची भेट म्हणून तिला दिलरुबा दिला होता. रात्रीं ओवाळणीनंतर ताईनं दिलरुबा हातीं घेतला. एकवार दोघांकडे पाहिलं. आणि मग थरथरत्या तारांच्या स्पंदनांतून निघणाऱ्या स्वरलहरींनीं सारं वातावरण सुगंधित झालं. वाजवतां वाजवतां ताई मधूनच डोळे मिटे; जणूं काय तिची समाधीच लागे. डोळे मिटून पूजा करतांना जो अपूर्व भक्तिभाव तिच्या मुखावर दिसे, तोच या संगीत-समाधींतहि दिसत होता.

आणि ताईबरोबरच तिच्यासमोर बसलेल्या दोघांचीहि समाधि केव्हां नि कशी लागली, हें त्यांचं त्यांनासुद्धां समजलं नाहीं. प्रत्येक गोष्टीकडे मिष्किलपणें पाहणाऱ्या भय्यासाहेबांची सुद्धां क्षणभर नादब्रह्मीं टाळी लागली. इतर वेळीं आपण कितीहि दूर असलों, तरी आपण या दोन नाजुक जीवांच्या खरोखर किती जवळ आहोंत, याची प्रतीति भय्यासाहेबांना या क्षणीं आली.

आणि अखेर त्या नादलहरी जेव्हां हळूंहळूं शून्यांत विलीन झाल्या, तेव्हां एका स्वर्गरम्य स्वप्नांतून आपणांस हलकेंहलकें जाग येत आहे, असं तिघांनाहि वाटलं.

त्या क्षणीं तिघांचंहि भावजीवन एक आहे याचा साक्षात्कार तिघांनाहि पटला.

नंतर शब्दानं बोलण्यासारखं कांहींच उरलं नाहीं. एक शब्दहि न बोलतां तिघंहि उठलीं.

——आणि याच अनुभवांची पुनःप्रतीति त्या तिघांना गेलीं तीस वर्षें सतत येत असे.

...कोपऱ्यांतल्या दिलरुब्याकडे पाहत असतां भय्यासाहेब आणि रावसाहेब यांना पुन्हां एकदां तो संगीतसमाधीचा नि भावमीलनाचा अनुभव आला. त्या स्वरलहरींनीं दिवाणखाना अजूनहि भारावला आहे, असा भास त्यांना झाला. आज ताई नसली, तरीहि तिचं अस्तित्व सर्वत्र कसं भरून राहिलं आहे, याचीहि विलक्षण जाणीव दोघांना झाली.

"ताई!"—रावसाहेब उद्गारले. जणूं ते म्हणत होते——"ताई, काय जादू भरली आहे तुझ्या नांवांत!"

भय्यासाहेबांनीं न कळत त्या प्रिय नांवाचा उच्चार केला.

"तीस वर्षांनीं आज पहिल्यांदाच ताई नाहीं असा हा दिवस!"

"ती नाहीं हें इतकें जाणवेल, अशी कल्पना नव्हती." भय्यासाहेब धुराच्या वर्तुळांकडे शून्य दृष्टीनें पाहत म्हणाले. "बत्तीस वर्षांपूर्वी ती माझ्या घरांत आली."

"आणि एका वर्षानें मी इथं आलों." रावसाहेब म्हणाले.

"आणि या घरांतलाच झालों." भय्यासाहेबांनीं तें वाक्य पुरं केलं.

"होय, घरांतलाच झालों!" रावसाहेबांच्या उद्गारांत समाधान होतं कां अतृप्ति होती कीं तळमळ होती, हें सांगणं कठिण आहे.

"आणि त्याच वर्षी तूं कसलंसं कवितांचं पुस्तक प्रसिद्ध केलंस नंतर..."

"होय, माझा पहिलाच कवितासंग्रह."

"तूं तो मला अर्पण करणार होतास; पण तुझ्या कविता मी कधींच वाचूं शकलों नाहीं!" भय्यासाहेब निर्दयपणानं म्हणाले.

"आणि मी तो पुढें कोणालाच अर्पण करूं शकलों नाहीं. अर्पणपत्रिकेशिवाय कवितासंग्रह!" आपल्या हातून हें धाडस कसं घडलं, त्याचं रावसाहेबांना अजूनहि आश्चर्य वाटत असावं जसं कांहीं.

आणि आपल्या वृद्ध, कांपऱ्या आवाजांत रावसाहेब गुणगुणूं लागले——

यौवन फुललें, भाव बहरले लाजत ये प्रीती;
भावसंपदा उधळुं कुणाच्या पदचिह्नांवरतीं?

रावसाहेबांचा आवाज जरा जड झाला. क्षणभर थांबून त्यांनीं कांहीं तरी निश्चय केला.

नंतर अगदीं सावकाश एक एक शब्द उच्चारीत ते म्हणाले: "आज तो कवितासंग्रह मी ज्याचा त्याला अर्पण करणार आहे!"—रावसाहेबांच्या गुणगुणण्याकडे आणि बोलण्याकडे भय्यासाहेबांचें लक्ष होतं कीं नाहीं कुणास ठाऊक? त्यांचे डोळे मिटलेले होते. पण तोंडांतून मात्र धूम्रवलयें बाहेर पडत होतीं.

हा गृहस्थ डोळे मिटून धूम्रपान करूं तरी कसा शकतो, याचं रावसाहेबांना नेहमींच नवल वाटे. तोंडांतून धुराचं वर्तुळ सोडतांना तें डोळ्यांनीं सुद्धां पाहिलं पाहिजे. डोळ्यांना धूम्रवलयं दिसलीं नाहींत तर धूम्रपान करायचं तरी कशाला?

धूम्रवलयांकडे भय्यासाहेबांनीं चालविलेल्या दुर्लक्षाचा या वेळीं रावसाहेबांना भारी राग आला.

मनाचा केवढा हिय्या करून आपण केवढा भीषण निश्चय जाहीर केला; पण भय्यानें डोळे उघडून पाहिलं सुद्धां नाहीं. त्याच्या कानांत आपले शब्द घुसले कीं नाहीं, कुणास ठाऊक? आपला सर्व प्रयत्न फुकट गेला तर? पुन्हां तेवढा धीर करणं किती कठिण आहे!

अस्वस्थतेनें रावसाहेबांनीं सिगरेटचे दोन-चार झुरके भराभर घेतले. मग त्यांनीं पुन्हां जिवाचा धडा केला: "भय्या, मला तुला कांहीं तरी सांगायचं आहे. मी...मला..."

रावसाहेबांचा चमत्कारिक आवाज ऐकून भय्यासाहेबांनीं डोळे जरासे किलकिले केले. एक क्षण थांबून ते म्हणाले, "हं चालूं दे. मी ऐकतों आहें."

पण भय्यासाहेब खरोखरच ऐकत होते कीं नाहीं, याची रावसाहेबांना शंकाच होती. त्यांनीं ऐकलं नसेल तर बरंच, असंहि क्षणभर त्यांना वाटलं...कवितासंग्रह ज्याचा त्याला अर्पण? छे. छे. आपली हिम्मत नाहीं तेवढी.

पण नाहीं. आज बोललों नाहीं तर पुन्हां कधींच बोलणं होणार नाहीं, आणि मग असंच... नाहीं; आज बोलून टाकलंच पाहिजे...ताईच्या पवित्र स्मृतीला साक्षी ठेवून भय्यासाहेबांच्या निर्मळ मित्रप्रेमाचं इमान राखण्यासाठीं...आज बोललंच पाहिजे ! नाऊ ऑर नेव्हर !

पुन्हां रावसाहेबांनीं एक आवंढा गिळला.

" भय्या, ऐकतो आहेस का भय्या ?"

" गो अहेड "

" भय्या,...कसं सांगूं ? ताई आणि मी... एका वेळीं...म्हणजे एकदांच...आमच्याकडे..." वाक्य पुरं न करतांच रावसाहेबांनीं निराशेनं असहायतेनं मान टाकली.

" राऊ, हें पाहा आज थट्टेचा दिवस नाहीं."

" भय्या, देवाशपथ थट्टा नाहीं. गेलीं तीस वर्षं ही गोष्ट मी उराशीं बाळगून आहे...हजारदां प्रयत्न करूनहि ती मी सांगूं शकलों नाहीं. पण आज या पवित्र दिवशीं...ताई गेल्यानंतर... माझ्याच्यानं राहवत नाहीं...माझ्या हातून चूक झाली आहे; पण मी सज्जन आहे...आज जर मी बोललों नाहीं, तर मेल्यानंतरहि मला शान्ति मिळणार नाहीं."

भय्यासाहेबांनीं एकदां रावसाहेबांकडे जरासं न्याहाळून पाहिलं. त्यांच्या विस्तीर्ण कपाळावर घर्म-बिंदू चमकत होते. भय्यासाहेबांच्या ओठांवर त्यांचं नेहमींचं अर्धस्फुट स्मित चमकलं. एक शब्दहि न बोलतां त्यांनीं पुन्हां डोळे मिटले नि एक प्रचंड धूम्रवलय तोंडाबाहेर सोडलं.

रावसाहेबांनीं पुन्हां मोठ्या कष्टानं एक एक शब्द उच्चारीत बोलायला सुरुवात केली " भय्या, ऐक–एक दिवस मी नि ताई–कसं सांगूं, भय्या ?"

भय्यासाहेबांनीं डोळे उघडून रावसाहेबांकडे एक तीव्र दृष्टिक्षेप केला.

"काय सांगायचं तें चटकन् सांगून टाक–– उगाच !" "उगाच रड्डं नकोस" असं वाक्य भय्या-साहेबांच्या अगदीं ओठांवर आलं होतं. पण त्यांनीं तें तसंच दाबलं. नंतर आपल्या प्रेमळ राऊला त्याच्या संकटकाळांत मदत करण्याच्या इच्छेनं ते म्हणाले––

" म्हणजे ताई...माझी धर्मपत्नी...माझ्याशीं बे-इमान झाली होती. असंच तुला म्हणायचं आहे ना, राऊ ?"

" नाहीं रे भय्या ! तुझी ताई अगदीं धुतल्या तांदळासारखी शुद्ध होती. स्फटिकासारखी तेजस्वी होती...निर्मळ होती...इमानी होती... बेइमान होतों ते आपण;––होय, आपण दोघंहि !" शेवटचं वाक्य रावसाहेबांनीं ठासून उच्चारलं.

शेवटीं एकदांचं काय तें बोलून टाकलं, या कल्पनेनं रावसाहेबांचा जीव भांड्यांत पडला. त्यांनीं एक क्षणभर भय्यासाहेबांकडे पाहिलं. त्यांच्या निर्विकार चेहऱ्याकडे बघून रावसाहेबांचा धीर बराच चेपला. नंतर दोन क्षण विचार करून त्यांनीं कॉलेजांत लेक्चर देण्याच्या तयारींत बोलायला सुरुवात केली––" भय्या, तीस वर्षांपूर्वींची गोष्ट. तुम्हीं दोघांनीं नुकताच संसार थाटला होता; आणि गाऊन चढवून मी प्रोफेसर बनलों होतों. तेव्हां तूं अगदीं उमदा गडी होतास. मिलिटरींत गेला असतास, तर जनरल झाला असतास. नाटकांत गेला असतास, तर 'हीरो' झाला असतास, गांवांतल्या साऱ्या सुंदर पोरींनीं जीव टाकला असता तुझ्यासाठीं."

भय्यासाहेबांना आपल्या ऐन तारुण्याची आठवण होऊन क्षणभर अवसान चढल्यासारखं झालं. पण रावसाहेबांच्या भाषणाचा रोख लक्षांत येऊन ते जरासे अस्वस्थ झाले. कांहीं तरी बोलायचं म्हणून ते म्हणाले, " अरे पंचविशींत तर सगळेच जवान ऐटबाज दिसतात. तूं एवढा नाजूक कवि, राऊ ! पण तूंहि कांहीं वाईट दिसत नव्हतास. टेनिस खेळत असतांना किती तरी तरुण मुली तुझ्याकडे बघत राहायच्या !––अर्थात्, तूं साऱ्या मुलखाचा लाजरा. त्यामुळं तुझी त्या मुलींकडे बघायचीसुद्धां कधीं हिम्मत झाली नाहीं; नि त्यामुळं ती गोष्ट तुला कधीं कळलीहि नसेल ! आणि म्हणूनच राऊ, आपण अखंड ब्रह्मचारी राहिलांत !"

भय्यासाहेबांच्या या शब्दांमुळं रावसाहेबांना त्या उतारवयांतहि क्षणभर लाजल्यासारखं झालं ! पण नंतर विषयान्तर होत आहे, हें लक्षांत घेऊन राव-साहेबांनीं पुन्हां मूळ विषय सुरू केला.

" त्या वेळीं आपल्या या शहरांत एकच म्हणजे एकमेव लेडी डॉक्टर होती... "

" डॉक्टर मिस माणिक देशमुख... "

" बरोबर ओळखलंस. मोठी फॉर्वर्ड बाई होती ती. आणि सुंदरहि होती. तिचा गोरापान वाटोळा चेहरा, अन् घारे डोळे अन् मोत्यांसारखे दांत..."

" हं...हं...तिच्यावर काव्य करूं नकोस. मला तरी तिचं वर्णन करून सांगण्याची जरूर नाहीं... आणि मोत्यांसारखे दांतदेखील किती चावरे असूं शकतात...!" आणि भय्यासाहेबांनीं दांत चावले. आपण काय भलतंच एकदम बोलून गेलों, असं त्यांना वाटलं.

भय्यासाहेबांच्या या अर्धवट कबुलीजबाबामुळं आपलं काम बरंच सोपं झालं आहे असं समजून रावसाहेब नेटानं पुढं म्हणाले, " भय्या, तूं आपल्या देवतेसारख्या गृहलक्ष्मीकडे पाठ फिरवून त्या नखरेल डॉक्टरणीच्या मागं लागलास. तुम्हां दोघांनाहि वाटत होतं कीं, जगांत कोणाला डोळेच नाहींत ! ताईच्या निष्कपट मनाचीदेखील तुझ्या दुष्कर्माबद्दल खात्री पटली. पण त्या साध्वीनं एक अक्षरसुद्धां तोंडावाटें काढलं नाहीं. पण आंतल्या आंत तिनं काय काय व कसं कसं सोसलं असेल, याची तुला कल्पनाहि नसेल ! "

" पण तुला तरी नक्की असेल ! " भय्यासाहेब निर्विकारपणानं म्हणाले. पण त्यांच्या वाक्यांतला सुप्त उपरोध रावसाहेबांच्या वर्मीं झोंबला. म्हणून ते जरा आवेशानंच म्हणाले—" होतीच ! आणि कां, हेंच मी तुला आतां सांगणार आहें. "

रावसाहेबांचा आवेश क्षणांतच ओसरला. प्रेमाच्या त्रिकोणावरची एखादी कविता शिकवण्या-च्या संथ आवाजांत त्यांनीं सुरुवात केली—
" ऐक. ... माझ्या आईनंतर माझ्यावर प्रभाव पाडणारी पहिली स्त्री म्हणजे तुझी मनोरमा. एखाद्या तेजस्वी तारकेप्रमाणं तिनं माझ्या जीवनाकाशांत प्रवेश केला. आणि मी भक्तिभावानं तिच्याकडे बघूं लागलों. त्या देवतेचा मी मूक पुजारी बनलों."—

" ...हें भावगीत आतां पुरं कर; आणि मुद्द्यावर ये " भय्यासाहेब जरा आडदांडपणानं मध्येंच म्हणाले. रावसाहेबांशीं बोलतांना ते फार क्वचितच आडदांडपणा दाखवीत.

" हा मुद्दाच आहे " रावसाहेब उत्तरले, " मी तिचा भक्त असल्यामुळंच तिचं मन मला कळत होतं तिच्या मूक वेदना मला समजत होत्या, म्हणून एक दिवस मोठा हिय्या करून मी तिला सूचक प्रश्न केला. ऐकलं न ऐकलंसं करून ती म्हणाली, ' कांहीं नाहीं हो. बेबीच्या जन्मापासून मला जरा अशक्तपणा आला आहे. तुम्ही उगीच काळजी करीत बसूं नका, भावजी. ' आणि त्या दिवशीं तें बोलणं तितक्यावरच राहिलं. ...मग सत्तावीस वर्षांपूर्वीची ती वाढदिवसाची रात्र आली. मी नेहमींप्रमाणं वेळेवर आलों होतों. बेबी झोंपली होती. घरांत सामसूम होती. नेहमींप्रमाणं ओवाळ-णीची तयारी करून ताई वरती आली. पण तुझा पत्ता नव्हता. तुला उशीर कां झाला नि त्या वेळीं तूं कुठं असशील, हें आम्हांला दोघांनाहि पक्कं माहीत होतं. म्हणून त्यासंबंधीं बोलायचीसुद्धां आम्हांला भीति वाटत होती. ज्याबद्दल बोलायला पाहिजे, तोच विषय नेमका वर्ज्य होता. मग बोला-यचं तरी काय ? ताईनं बेबीचा स्वेटर विणण्याचं निमित्त करून वेळ काढण्याचा यत्न केला. मीहि टेबलावरचा 'मनोरंजन'चा ताजा अंक काढून गुर्जरांची गोष्ट वाचायचा प्रयत्न करूं लागलों. मोठ्या कष्टानं वेळ जात होता. भिंतीवरच्या मोठ्या घड्याळाच्या टकटकीची आम्हांला भीति वाटूं लागली. दहाचे ठोके पडूं लागले, तेव्हां तर आम्ही दचकलोंच ! माझ्या हातांतलं मासिक गळून खालीं पडलं. मी ताईकडे पाहिलं. लोंकरीची गुंडी सावरून ताई झरझर टाके घालीत होती. तिला माझ्या मनांतला भाव समजला. पुन्हां मी मनोरंजनचा अंक डोळ्यांसमोर धरला. पण गुर्जरांची गोष्ट किंवा गोविंदाग्रजांची कविता त्या दिवशीं माझं मनोरंजन करायला असमर्थ ठरली. माझे डोळे जणूं ताईच्या अंतःकरणाच्या आंत आंत शोध घेत होते. तिच्या हृदयांतल्या असह्य वेदनेवर हलक्या हातानं चंदनाची उटी लावावी, हीच माझी इच्छा होती. वेळ जातां जाईना ! त्या वेळीं तुझा असा संताप आला होता मला ! तो मत्सर नव्हता. देवाशपथ त्यामध्यें

स्वार्थभावना तिळभरहि नव्हती. एका छटेल बाईच्या नादीं लागून तूं त्या देवतेशीं बेइमानी करावीस आणि तिला दुर्धर कष्ट द्यावेस; तिच्या वाढ-दिवसाच्या पवित्र दिवशींसुद्धां तुला त्या उनाड मैनेचा मोह सोडतां येऊं नये, याचा मला भयंकर संताप आला होता...मीं ताईकडे पाहिलं. पण तिच्या शान्त स्निग्ध मुखाकडे पाहिलं कीं माझा संताप थंड होई...अकराचे ठोके पडले! मीं दचकून ताईकडे पाहिलं. तिच्या डोळ्यांत एक टपोरा अश्रु-बिंदु तरारला होता. मी बघतांच तिनं तो लप-विण्याचा प्रयत्न केला. पण तिच्या गालावरून ओघळणारा तो अश्रुबिंदु मीं पाहिला आणि मी ताडदिशीं उठलों आणि दाराकडे झेंप घेतली. असंच जावं नि त्या रांडेच्या पलंगावरून तुला फरफटत ओढून आणावं आणि या देवतेच्या चरणांशीं नाक घासायला लावावं असं मला एकसारखं राहून राहून वाटत होतं. मी कुठं निघालों होतों, हें तिनं क्षणार्धांत ओळखलं. 'कुठं निघालात, भावजी?' तिनं भयभीत होऊन विचारलं. मी काय उत्तर देणार, हें तिला पूर्ण माहीत होतं.

'असाच जातों नि भय्याला घेऊन येतों!'

'नका भावजी! जाऊं नका. माझ्या गळ्याची शप्पथ आहे तुम्हांला!'

'मी दारापाशींच उभा होतों दगडासारखा. जावं का मागं परतावं—मला कांहींच कळत नव्हतं;

'ताई, मला आतां अडवूं नकोस.'

"ताईनें माझ्याकडे काकुळतीच्या दृष्टीनं पाहिलं. आम्ही एक क्षणभर एकमेकांकडे पाहतच राहिलों आणि कां कुणास ठाऊक, मला वाटलं कीं ताईच्या दृष्टींत एक नवाच, स्नेहाचा भाव प्रकट झाला आहे. कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली, 'भावजी तुम्ही तरी जाऊं नका मला सोडून' आणि एकदम ती माझ्याजवळ आली. आणि माझा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली, 'भावजी, एवढा आधार राहिला आहे आतां मला'! आणि जवळजवळ ओढीतच आणून तिनं मला खुर्चीवर बसवलं. तिच्या त्या कांपऱ्या हाताच्या स्पर्शानं माझ्या सर्वांगांतुन बिजलीची चमक सणसणत उठली आणि माझ्या हातांतला तिचा हात जणूं कांहीं नकळत मीं दाबला. 'भावजी, शपथ आहे माझी तुम्हांला!' ती पुन्हां म्हणाली. तिला हुंदका आला. तिचं सारं शरीर शहारल्यासारखं वाटलं मला. दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन तिनं माझ्या खुर्चीवर मान टाकली. तिच्या अंबाड्याच्या मंद सुगंधानं मला क्षणभर धुंद केलं. काय करावं हेंच मला क्षणभर सुचेना. मीं हळुवारपणानं तिच्या पाठीवरून हात फिरवला... थोडा वेळ तसाच गेला...आणि मग ती शान्त झाली. तिनें वर मान उचलून माझ्याकडे पाहिलं. तिच्या डोळ्यांतून अपार स्नेह ओसंडत होता. कृतज्ञतेची ती शान्त मूर्ति पाहून माझ्या साऱ्या वासना निर्विषय झाल्या.

"ती मुकाट्यानं उठली नि एक शब्दहि न बोलतां आपल्या खुर्चीवर जाऊन बसली. तिचीं बोटं पुन्हां फिरूं लागलीं; झराझर टाके घातले जाऊं लागले. आणि माझ्या मनालाहि अपूर्व शान्ति मिळाली. सारी खळबळ शान्त शान्त झाली. तुझ्याबद्दलचा संतापसुद्धां मी विसरून गेलों. ताईच्या त्या स्नेहपूर्ण वृत्तींत अपूर्व समाधानाचा ठेवा मला सांपडला...कांहीं महिन्यां-पूर्वीं आकाशांत तळपणारी शुक्राची चांदणी माझ्या हातांत आल्यासारखी जणूं मला वाटली! माझ्या मनोमंदिरांतली देवता पायऱ्या उतरून माझ्याजवळ आली!—आणि माझी खरी ताई मला प्रथमच मिळाली! ... हें परिवर्तन कसं घडलं, हें माझं मलाच समजलंसुद्धां नाहीं. होय! त्या क्षणीं माझ्या-कडे पाहणारी ती देवता नव्हती; तारका नव्हती—एक स्त्री होती! एक स्त्री! माझी ताई!!—आणि थोड्या वेळानं मग तूं आलास. तुझं बहुधा आमच्या-कडे लक्षच नव्हतं. आपलं बदकर्म झांकण्याकडेच तुझं सारं लक्ष होतं. श्रमांमुळें थकलेल्या आपल्या शरीरावर टवटवी आणण्याचा तूं यत्न करीत होतास. आपलं पाप झांकण्यासाठीं तूं हंसून संपादून नेत होतास. या धडपडींत तुला आमच्याकडे बघण्याला वेळच नव्हता. वेळ नव्हता नि धीर पण! त्यामुळें गेल्या तासाभरांत आमच्या दोघांत काय प्रचंड परिवर्तन घडलं होतं नि त्याचा तुझ्या जीवनावर-सुद्धां किती खोलवर परिणाम घडणार होता, याची तुला किंचित्‌हि कल्पना नव्हती. निरर्थक बडबड करीत तूं कसं तरी ओवाळून घेतलंस नि थकल्याचं










निमित्त करून स्वतःची सुटका करून घेतलीस...पण माझं मनःस्वास्थ्य मात्र त्या क्षणापासून नाहींसं झालं. मीं स्वतःला लाख शिव्या मोजल्या. पापी चांडाळ, बेइमान, विश्वासघातकी—सारं सारं स्वतःला म्हणवून घेतलं...पण मधूनच मला वाटे कीं, मीं असं काय पाप केलं आहे? माझा मित्र आपल्या देवतातुल्य पत्नीशीं कपट करतो, पाप करतो, तेव्हां तिच्याबद्दल सहानुभूति दाखवणं, त्याला वाममार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करणं, हा काय गुन्हा झाला? ताईनंसुद्धां माझ्या मनांतली अस्वस्थता ओळखून मला दिलासा देण्याचे परोपरीनं प्रयत्न केले...

"आणि अखेर तुला पापकर्मापासून कायमचा वांचविण्यासाठीं आणि माझ्या सदसद्विवेकबुद्धीची टोंचणी थांबवण्यासाठीं, डॉक्टरीणबाईंना तुझ्यापासून तोडून काढण्याच्या उद्योगाला मी लागलों...

"सुदैवानं हॉस्पिटलचे सर्जनसाहेब माझे परमस्नेही होते. मी त्यांच्यामार्फत डॉक्टरीणबाईंना सज्जड समज देवविली आणि नंतर त्यांची बदलीहि करवून घेतली. लग्न केल्याखेरीज तुम्हांला या गांवांत परत येतां येणार नाहीं, असं बाईसाहेबांना बजावण्यांत आलं..."

"स्काउंड्रल" इतका वेळ शांतपणानं डोळे मिटून ऐकणारे भय्यासाहेब एकदम ओरडून उठले, "राऊ! तूं असा पाताळयंत्री असशील, अशी मला कल्पना नव्हती!" कधीं नव्हत ते भय्यासाहेब आज प्रथमच रावसाहेबांवर चिडलेले दिसले.

—एका क्षणांत त्यांच्या डोळ्यांसमोरून त्यांची माणिक–तिचं कामुक प्रेम–त्यांच्या ताटातुटीचा अखेरचा क्षण–सारं सारं चमकून गेलं. अरेरे! ऐन ज्वानींतलं तें उद्दाम स्वप्न या रडक्या प्रोफेसरनं धुळीला मिळवलं होतं!—या कल्पनेनं भय्यासाहेबांचा क्षणभर संताप संताप झाला. वास्तविक त्या गोष्टीला आतां पंचवीसहून अधिक वर्षे लोटलीं होतीं. पण माणिकच्या आकस्मिक ताटातुटीमुळें आपल्या हृदयावर केवढी खोल जखम झाली होती, याची कल्पना त्या क्षणाला भय्यासाहेबांना प्रथमच आली. ओली जखम किती तीव्र वेदना देऊं शकते... आणि वंचित सुखाची हळहळ किती तापदायक होऊं शकते...हें त्यांना जणूं त्याच क्षणाला समजलं.

जबरदस्त प्रयत्नांनीं भय्यासाहेबांनीं हे सर्व विचार आवरले.

"होय, मीच हें सर्व केलं"...प्रोफेसरसाहेबांचं भाषण शांतपणें सुरू होतं...."पण थांब, माझा कबुलीजबाब खरा पुढंच आहे...तूं डॉक्टरीणबाईंचा नाद सोडलास; आणि ताईबरोबर पुन्हां प्रामाणिकपणानं प्रेमळपणानं संसार करूं लागलास. तुमच्या सुखी संसाराकडे बघून माझे डोळे निवले. मला वाटलं माझ्या मनांतला क्षणिक उन्माद जिरला नि अपूर्व भगिनीप्रेमाची चिरशान्ति मला लाभली. —पण हाय! माझं हें समाधान क्षणभंगुर ठरलं. वाढदिवसाच्या रात्रीं घडलेल्या प्रसंगाची स्मृति मला सतत बेचैन करीत होती. ताईच्या नाजुक हातांचा तो स्पर्श, तिचे उष्ण निःश्वास, तिच्या केसांचा मंद सुगंध...आणि तिची ती स्नेहार्द्र दृष्टि—माझ्या मनांतून क्षणभरहि हलेना! माझं रक्त जणूं बंड करून उठलं होतं. माझ्या डोक्यांत पिसाट कल्पनांचं थैमान चालूं होतं. माझं मलाच सारखं भय वाटत होतं. माझ्या साऱ्या भावना, साऱ्या वासना, साऱ्या कल्पना कामाच्या डोंगराखालीं चिरडून टाकण्याचा यत्न मीं केला. महिनेच्या महिने रात्ररात्र जागून मी माझा वाङ्मयीन टीकेवरचा प्रबंध पुरा केला. दिवसभर कामाच्या रगाड्याखालीं स्वतःला भरडून घेतलं. पण तरीहि प्रत्येक क्षणीं, प्रत्येक विचाराच्या मागं ताईची शान्त मूर्ति उभी असे!... वरवर मात्र मी अगदीं शान्त दिसत होतों. तुझ्याशीं माझी वागणूक अत्यंत स्नेहाची, मोकळेपणाची होती. ताईशींसुद्धां माझी वागणूक अत्यंत संयमाची, शान्ततेची होती. आणि अशा रीतीनें दिवस गेले; महिने गेले.—आणि पुन्हां वाढदिवस आला. मी दिवाणखान्यांत बसलों होतों. खालचं काम आटोपल्यावर ओवाळण्याचं साहित्य घेऊन ताई वर आली. नीरांजनाच्या मंद प्रकाशांत तिच्या गोऱ्यापान मुखावर मला अपूर्व भावदर्शन घडलं. तूं अजूनहि बाहेरून आला नव्हतास पण तुला उशीर झाला तरी त्याबद्दल कोणालाच कांहीं वाटण्याचं कारण नव्हतं. तुझी वाट पाहत आम्ही बसलों. मी टेबलावरून



अनुक्रमणिका








मनोरंजनाचा ताजा अंक उचलला. गुर्जरांची अ-परिहार्य गोष्ट होतीच ! गोविंदाग्रजांची कविता मात्र नव्हती. पण माझ्या मनांत गडकऱ्यांच्या अकाल निधनाबद्दलचे विचार चालू नव्हते ! — तर गेल्या वर्षी याच वेळीं घडलेल्या प्रसंगाची पुनरावृत्ति माझ्या डोळ्यांसमोर चालली होती— ताईच्या शान्त चेहऱ्यावर मात्र अपूर्व शान्तता होती. तिच्या नजरेंत अपार स्नेहभाव होता...माझं वाचण्याकडे लक्ष लागत नाहीं, हें तिनं ताबडतोब ओळखलं.

" 'भावजी, जरा मोठ्यानं वाचा कीं कांहीं तरी.'— मला माझ्या अडचणींतून बाहेर पडण्याचा रस्ता तिनं दाखविला. मग मींहि, कांहीं न बोलतां, वाचा-यला सुरुवात केली. माझे डोळे अक्षरांवरून फिरत होते; माझ्या तोंडून शब्दहि बाहेर पडत होते !... पण माझे मन, माझे सारे जीवभाव, गेल्या वर्षीच्या स्पर्शासाठीं तळमळत होते !... वाचतां वाचतां, माझ्या डोळ्यांना अक्षरें दिसत नाहींशीं झालीं. माझा आवाज घोगरा झाला आणि वाचतां वाचतां मी एकदम थांबलों... मीं ताईकडे पाहिलं. आणि मग एकदम माझ्यांत काय संचरलं, कुणास ठाऊक ! मी एकदम उठलों नि ताईजवळ जाऊन तिचे दोन्ही हात घट्ट धरले ! तिची माझी दृष्टादृष्ट झाली. तोच शान्त भाव, तीच स्नेहपूर्ण दृष्टि—

" 'भावजी ! ' किंचित् कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली— 'भावजी... ' आणि मी भानावर आलों; आणि असहायतेनं तिच्या मांडीवर डोकं टेकलं !... तिचा नाजुक हात माझ्या केसांवरून हळुवारपणें फिरला. क्षणा दोन क्षणांनंतर अत्यंत प्रेमळ आवाजांत ती म्हणाली, 'भावजी, धीर धरा ! भावजी, सावध व्हा ! ' मीं डोकं वर उचललं नि वरती पाहिलं. ताईच्या दृष्टींत यत्किंचित्‌हि क्रोध नव्हता, अधिक्षेप नव्हता. अथांग शांति, अपार सहानुभूति, अपूर्व स्नेहभाव...मी उठून उभा राहिलों...तिनं माझ्या हातांत 'मनो-रंजना 'चा अंक दिला.

" 'भावजी, ते येईपर्यंत ती गोष्ट पुरी करूं या ! ' ती म्हणाली; आणि हातांतल्या विणकामावर तिचीं बोटं झरझर फिरूं लागलीं !

" मीं पुन्हां मासिक उघडलं नि वाचायला आरंभ केला. डोळ्यांसमोर सैरावैरा धांवणारीं अक्षरं हळूं-हळूं स्थिर होऊं लागलीं. आवाजांतला घोगरेपणा कमी झाला; छातींतली धडधड मंद झाली. थोड्याच वेळांत माझं मन शान्त झालं. वादळ शान्त होऊन कोंवळं ऊन पडलं ! माझ्या ताईनं मला केवढ्या संकटांतून वाचविलं होतं ! अपार कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं नि मीं तिच्याकडे पाहिलं. अपार सहानुभूतीनं भरलेले तिचे डोळे माझ्यावर स्नेहसुधेची वृष्टि करीत होते !—

" आणि थोड्या वेळानं तूं आलास. नेहमींच्याच घाईनं. नेहमींच्याच बेफिकिरीनं. हंसतखेळत आलास; नि एका क्षणांत सारं घर डोक्यावर घेतलंस ! आणि जणूं कांहीं घडलंच नाहीं, अशा रीतीनं आपण बसलों. ओवाळणी झाली. कॉफी झाली. हास्यविनोद झाला ...आणि शेवटीं ताईनं दिलरुबा काढला. आणि स्वर्गीय स्वरसंगतींत आपल्या तिघांचं जीवन-संगीत विलीन झालं !—आणि त्या दिवसापासून माझ्या मनांतला सैतान शान्त झाला...ताईचें माझ्यावर प्रेम ? छे. छे. कल्पनाच नको ती ! पण तिच्या मनांत माझ्याबद्दल सहानुभूति आहे, अशी माझी खात्री पटली. आणि तेवढं मला पुरं होतं. तिच्या सहवासांत मला अपूर्व समाधान व शांति लाभत होती...माझ्या मनांतला उन्माद केव्हांच ओसरून गेला होता. तिच्या सहवासांत नंतर मला कधींहि भीति वाटली नाहीं. तिलाहि कधीं माझी भीति वाटली नाहीं अशी माझी खात्री आहे. माझा सहवास टाळण्याचा तिनं कधींहि, अगदीं एकदांसुद्धा, प्रयत्न केला नाहीं. माझ्यावर तिनं जो हा विश्वास टाकला होता, त्या विश्वासाला पात्र ठरणं, हें माझं परमपवित्र कर्तव्य होतं. तोच माझा निदिध्यास होता.——नंतर तूंहि तुझं रंगेल जीवन सोडून दिलंस. नखरेल पोरींच्या पाठीमागं लागणं बंद केलंस. आणि फक्त त्या एकाच स्त्रीच्या चरणावर आपलं जीवनसर्वस्व अर्पण केलंस. खरं ना ?—अर्थात्, तिच्यावर प्रेम न करणं मला सर्वस्वीं अशक्यच होतं. पण माझ्या प्रेमाचं स्वरूप पार बदलून गेलं. पार्थिव सुखाची अभिलाषा पार विरून गेली. एका अपूर्व भावसाहचर्याचा उदय आमच्या दोघांच्याहि

मनांत झाला. आमचीं मनं खरोखरच अगदीं मिळून गेलीं. आम्ही एकत्र बसून तासन् तास गुजगोष्टी करीत असूं. कधीं कधीं एक अक्षरहि न बोलतां किती तरी वेळ आम्ही स्तब्ध बसत असूं. आमच्या गुजगोष्टी, आमची भाषा, आमची वृत्ति पाहून तुला नेहमीं हंसूं येई. तूं आमची नेहमीं थट्टाहि करीत होतास. पण आमच्या गुजगोष्टी जेव्हां चालत, तेव्हां आमचीं हृदयं परस्परांच्या किती जवळ ओढलीं जात, याची तुला थोडीसुद्धां कल्पना नसेल. तुला जर त्याची कल्पना असती, तर हंसण्याऐवजीं तूं मत्सरानं जळला असतास ! ''

—आणि मग रावसाहेब थोडा वेळ थांबले; त्यांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला नि मग पुन्हां म्हणाले, '' आतां ताई तिच्या देवाघरीं गेली आहे. तिच्या पुढच्या वाढदिवसाच्या आंतच, आपल्यापैकींहि कोणी तरी कदाचित्, तिच्या मागोमाग जाईल !— म्हणून या पवित्र दिवशीं माझ्या आयुष्यातलं हें एकमेव गुपित उघडं करणं माझं कर्तव्य आहे, असं मला वाटलं. आणि म्हणून मी म्हणतों, भय्या, जन्मांत फक्त एकदांच मी तुझ्याशीं प्रतारणा केली आहे. मी पापी नाहीं. पण या प्रतारणेसाठीं मला क्षमा कर ! ''

आणि रावसाहेबांनीं क्षमायाचनेसाठीं आपला हात पुढें केला. पण भय्यासाहेबांचं तिकडे लक्षच नव्हतं; त्यांचे डोळे अर्धवट मिटलेलेच होते. जवळ जवळ स्वतःशींच ते म्हणाले—'' वेडा कुठला ! क्षमा मागतो आहे लेकाचा ! हं ! तीस वर्षांपूर्वीं तूं जसा कवि होतास, तसाच अगदीं आजहि आहेस, राऊ ! अरे क्षमा कसली मागतोस ? आतां गुपित म्हणून तूं जें सांगितलंस, तें मला कधींपासून माहीत आहे ! ज्या दिवशीं ती गोष्ट घडली त्याच दिवशीं ताईनं मला ती सांगितली होती. ''—नंतर दोन क्षण थांबून भय्यासाहेब म्हणाले : '' आणि माझ्याबद्दल उगाच कांहीं गैरसमज करून घेऊं नकोस. माझा रंगेलपणा कधींच गेला नाहीं. अगदीं परवां परवांपर्यंत माझा रंगेलपणा चालूंच होता. फक्त सभ्यता राखून रंगेलपणा करायला मी शिकलों होतों. माणिकच्या प्रकरणापासून मी चांगला धडा शिकलों होतों !—पण मी तरी काय करूं ? तुम्ही माणिकला माझ्यापासून तोडलंत; अन् ताई ? माझ्याशीं ती कितीहि प्रेमळपणानं वागत असली, तरी तिचं मन मीं ओळखलं होतं; तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणावरहि तिचं प्रेम असणं शक्यच नव्हतं ! राऊ, माझ्यावर विश्वास ठेव, तेवढं एकच प्रेमनिधान तिच्या जीवनांत होतं !—तुमच्या दोघांच्या जिवांची कुतरओढ मी रोज पाहत होतों. तुम्हां दोघांना एकदां जवळ बोलवावं नि तुमचे हात एकमेकांच्या हातांत द्यावेत असं मला कितीदां तरी वाटत असे !— पण माझी हिंमत होईना- माझं पाप माझ्या डोक्यावर होतं; माझ्या शब्दांचा नि या अशा कृतीचा भलताच अर्थ होण्याचा संभव होता. शिवाय, मला माझं स्वतःचं दुःखहि कांहीं कमी नव्हतं. माणिकला विसरणं म्हणजे कांहीं सोपी गोष्ट नव्हती. तुम्ही मला खुशालचेंडू, भ्रमरवृत्तीचा समजत होतांत. माझं आयुष्य तसंच गेलं यांतहि शंका नाहीं. पण मी शपथेवर सांगतों, माणिकसारखी स्त्री मला अजून भेटली नाहीं ! मीं तिचा नाद सोडला व ताईच्या चरणावर जीवनसर्वस्व वाहिलं, असं कांहींसं तूं आतांच म्हणालास नाहीं ? पण कित्येक वर्षं माणिकच्या आठवणीखेरीज माझा एक क्षणहि गेला नसेल ! खोटं कशाला सांगूं ! तुझ्या ताईच्या सहवासांत असतांनाहि मला माणिकचीच आठवण होत असे ! रात्रीच्या रात्री मी माणिकच्या आठवणींत तळमळत काढल्या आहेत. ताईलासुद्धां हें माहीत आहे. खरोखर, ताई म्हणजे एक फार थोर, उदार मनाची स्त्री होती. प्रेम व सहानुभूति यांचा महासागर भरला होता तिच्या अंतःकरणांत ! तिन माझ्या वेदना ओळखल्या होत्या; पण तें न दाखवतां, माझं दुःख कमी करण्यासाठीं ती हजार परींनीं यत्न करीत असे. वास्तविक तिला स्वतःचं दुःख कांहीं कमी होतं का ? मी कवि नाहीं; भाविक भक्तहि नाहीं. पण तरीहि मी म्हणतों एखाद्या स्त्रीला देवता म्हणायचंच असेल, तर ताई खरोखरच देवता होती. तिचं माझ्यावर प्रेम नव्हतं यावद्दल मला क्षणभरहि वैषम्य वाटलं नाहीं कीं माझ्या मनांतला तिच्याबद्दलचा आदर रतिमात्रहि कमी



अनुक्रमणिका






झाला नाहीं. पण तरीहि माणिकला मात्र मी विसरूं शकलों नाहीं. मीं पुष्कळ स्त्रिया पाहिल्या आहेत. पण छे! माणिकसारखी माणिकच! आणि राऊ, त्या माझ्या माणिकला तूं माझ्यापासून तोडलीस!"

शेवटचं वाक्य उच्चारतांना भय्यासाहेबांचा चेहरा आरक्त झाला होता. आवाज कातर झाला होता.

"माणिक, माणिक! तिच्यासाठींच मी जन्माला आलों होतों अन् ताईसाठीं तूं!...पण माझा जन्म गेला माणिकची आठवण बुजवण्यांत अन् तुझा जन्म गेला नीति पाळण्यांत अन् कविता करण्यांत! आणि आतां म्हातारपणीं आपण दोघेहि मूर्खांसारखे कबुलीजबाब देत बसलों आहोंत! फक्त या समारंभाला आपली ताईच कमी आहे. ती असती तर!—"

आणि मग त्या दोघांनींही एकदमच भिंतीवरच्या जुन्या घड्याळाकडे पाहिलं.

एक...दोन...तीन...

अकरा वाजत होते!

—पण कोपऱ्यांतला दिलरुबा मात्र अजा वाजणार नव्हता!!

(रूपान्तर)

---

## एक खुलासा—

गेल्या ऑक्टोबर १९५० च्या 'नवभारत'च्या अंकांत 'गांधीजींचें विविध दर्शन' या मथळ्याखालीं प्रा. निर्मलकुमार बसु यांच्या 'गांधीचरित' या मूळ बंगाली पुस्तकाच्या मराठी अनुवादांतून कांहीं भाग उद्धृत केलेला आहे. त्या लेखाखालीं जी टीप जोडली आहे त्या टीपेंत, 'गांधीचरित' या मूळ बंगाली पुस्तकाचा मराठी अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर असून, तो अमळनेर येथील प्रताप हायस्कूलमधील शिक्षक श्री. बा. ना. जठार यांनीं केला आहे, असें म्हटलें आहे. खरोखरीं हा अनुवाद केवळ श्री. जठार यांनीं एकट्यांनींच केला नसून, तो करण्याच्या कामांत अमळनेर येथील 'तत्त्वज्ञानमन्दिर' या संस्थेतील फेलो श्री. चन्द्रोदय भट्टाचार्य यांचा पण तितकाच बरोबरीनें भाग आहे. म्हणजे 'गांधीचरित' या मूळ बंगाली पुस्तकाच्या मराठी अनुवादाची जबाबदारी श्री. भट्टाचार्य व श्री. जठार यांची संयुक्तपणें आहे. उपरिनिर्दिष्ट माहिती देणाऱ्या टीपेंत श्री. भट्टाचार्य यांचें नांव अनवधानतेनें राहून गेलें याबद्दल वाईट वाटतें.

—कार्यकारी संपादक. २८–१०–५०

श्री. बा. मु. लिमये

# प्रौढ-मतदानाचे संभाव्य परिणाम

" The two special problems which confront India in setting on foot a system of responsible Government are the huge numbers involved ......and the fact that only ·8 per cent of these are literate. Literacy is by itself no test of wisdom, character or political ability and illiteracy by no means implies that the individual is not capable of casting an intelligent vote on matters within the range of his own knowledge and experience. The Indian villager, like the peasant all over the world, is a fairly shrewd person. Illiteracy, however, inevitably restricts the range of the individual's knowledge and his power of access to knowledge. "

—Lothian Committee's Report.

आपल्या नव्या घटनेंत प्रौढ-मतदाना-( adult franchise )-चें तत्त्व मान्य करण्यांत आलें आहे. हें आपल्या घटनेनें अत्यंत धीटपणें टाकलेलें प्रगतिशील असें पाऊल आहे यांत शंका नाहीं. स्वित्झर्लंडसारख्या कांहीं पाश्चात्य देशांतून स्त्रियांना मतदानाचा हक्क अद्यापीहि नाहीं. फ्रान्समध्यें तर अलीकडेच ' फोर्थ रिपब्लिक ' च्या नव्या घटनेनें स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला. या लोकशाही-प्रधान पाश्चात्य देशांच्या उदाहरणांचा विचार करतां आपल्या भारतीय घटनेनें स्त्रियांसह सर्व प्रौढांना मतदानाचा सारखाच राजकीय हक्क देण्यांत सामाजिक न्यायभावनेबरोबर आपलें औदार्य व प्रगतिप्रियताहि प्रकट केलीं आहेत.

### प्रौढ मतदानाशिवाय गत्यंतरच नव्हतें

आपल्या देशांतील पौढमतदारांची संख्या प्रचंड आहे आणि ह्या मतदारांत निरक्षरांचें प्रमाणहि फार मोठें आहे. निरक्षरता नसती तर केवळ मतदारांची संख्या वाढते म्हणून प्रौढमतदान-पद्धतीस विरोध करणें युक्त झालें नसतें. राज्य-व्यवहारांत तत्त्वांबरोबरच सोयींचाहि विचार करावा लागतो व सोयीसाठीं तत्त्वाला थोडी मुरड घालावी लागते. परंतु मतदानाचा अधिकार ही अगदीं मूलभूत स्वरूपाची बाब असल्यानें तत्त्वाला प्राधान्य द्यावेंच लागलें असतें. अधिकार मत्तेवर अवलंबून ठेवणें ही लोकशाहीची थट्टा झाली असती. मत-दारांची संख्या शक्य तितकी कमी करण्याचा उपाय म्हणून मतदानाचा हक्क २१ व्या वर्षाऐवजीं २५ व्या वर्षीं प्राप्त व्हावा अशी तरतूद फार तर करतां आली असती. प्रौढमतदानपद्धतीला आपल्या येथें जो तात्त्विक विरोध होत असतो तो निरक्षरतेच्या मुद्द्यावरच होत असतो. निरक्षरांना मतदानाचा हक्क नसावा असें ठरविलें तर मतदारांची संख्या अगदींच थोडी होईल. देशांतील बहुसंख्य लोकांना मतदानाचा हक्क नाकारणें कांहीं कारणास्तव इष्ट असलें तरी शक्य होणारें नाहीं. उलट, लोकक्षोभ निर्माण करण्याची संधि मात्र चळवळ्यांना मिळेल. प्रौढ-मतदानाचा










पुरस्कार काँग्रेसनें केलेला असल्यानें नवी घटना करतांना प्रौढमतदानाच्या तत्त्वाला मान्यता देण्यावांचून गत्यंतर नव्हतें. निरक्षरांना मतदानाचा हक्क नाकारावा तर देशांतील बहुसंख्य लोकांना मतदानाचा हक्क नाकारावा लागेल. बरें, निरक्षरांना मतदानाचा हक्क द्यावा तर लोकशाहीला पोषक अशा सुबुद्ध मतदारसंघा-( enlightened electorate )-ला मुकावें लागेल. एवढेंच नव्हे तर सुबुद्ध मतदारांच्या मताला फारशी किंमतहि उरणार नाहीं. निरक्षर मतदारांचा वर्ग अतिप्रचंड व साक्षरांचा वर्ग अत्यल्प, अशा परिस्थितींत निरक्षरांच्या वर्गाकडे लक्ष ठेवूनच राजकीय पक्षांचें कार्य चालणार हें उघड आहे. कोणी कसाहि उपदेश करो, निवडणुका जिंकण्याची धडपडच राजकीय पक्ष करीत राहाणार हें उघड आहे. निवडणुका जिंकण्याचें उद्दिष्ट समोर ठेवूनच राजकीय पक्ष कार्य करीत राहणार. प्रौढमतदानाचे परिणाम कसेहि होणार असले तरी प्रौढमतदान पत्करण्यावांचून गत्यंतर नव्हतें, ही गोष्ट मात्र मान्य केली पाहिजे.

## राजकीय पक्षांचा सत्तेचा हव्यास

प्रातिनिधिक पद्धतीची लोकशाही जेथें प्रचलित असते तेथें विविध राजकीय पक्ष आपापले सामाजिक, राजकीय व आर्थिक कार्यक्रम जनतेसमोर ठेवतात व लोक आपणांस ज्या पक्षाचा कार्यक्रम पसंत आहे त्या पक्षाला निवडणुकींत मतें देतात. राजकीय, आर्थिक व सामाजिक कार्यक्रमाचा विचार करण्याचें किंवा मोजमाप करण्याचें सामर्थ्य आपल्या जनतेंत नाहीं. कोणत्याहि देशांत निवडणुकीच्या वेळीं आकर्षक घोषणा करण्यांत येत असतातच. आजचा राजकारणी काय करतो हें जॉर्ज बर्नार्ड शॉनें सुंदर रीतीनें वर्णन केले आहे :

" The politician, who once had to learn how to flatter kings, has now to learn how to fascinate, amuse, coax, humbug, frighten or otherwise strike the fancy of the electorate." आपल्या मतदारांच्या अज्ञानामुळें कार्यक्रमापेक्षां केवळ घोषणांवरच निवडणुका जिंकण्याकडे आपल्या राजकीय पक्षांचा कल राहील. सुव्यवस्थित, तर्कशुद्ध व व्यावहारिक कार्यक्रमांच्या अभावीं आपल्या देशांत आज 'सर्व आघाड्यांवर गोंधळा'-( chaos on all fronts )-ची परिस्थिति आहे. ती सुधारण्याचा फारसा संभव नाहीं. महत्त्वाच्या उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करूं, असें सांगितलें जातें पण असे धंदे कोणते व कोणत्या क्रमानें व किती कालावधींत त्यांचें राष्ट्रीयीकरण होणार याचा खुलासा होत नाहीं. बारेमाप आश्वासनें व दिखाऊ कार्यक्रम यांचा विचारच करावयाचा नाहीं, अशी संवय आपण लावून घेणें जरूर आहे. पांच वर्षांचा निश्चित व व्यावहारिक कार्यक्रम जो पक्ष देईल त्यालाच मतें द्यावींत.

परंतु असें होणें मोठें कठिण आहे. निरक्षरतेचा एक स्वाभाविक परिणाम असा होतो कीं माणूस परंपराप्रिय व गतानुगतिक होतो. काँग्रेसला पुढील निवडणुकींत बहुमत मिळेल हें स्पष्ट आहे. परंतु काँग्रेसच्या विजयांत जनतेच्या पुराणप्रियतेचा वांटा भरीव असणार आहे हेंहि स्पष्ट आहे. काँग्रेसच्या आजवरच्या कार्याचा प्रभाव मोठा आहे. त्यामुळें काँग्रेसपक्षाच्या कार्यक्रमाचा असा जनता विचारच करणार नाहीं. जसा काल लोटेल तशी ही परिस्थिति पालटेल. आपला मतदारसंघ विशाल व शिवाय पुराणप्रिय. म्हणून त्याचा अनुनय करणें जिकिरीचें आहे. समाजवादी पक्षाचे पुढारी 'सत्तासंपादनासाठीं संप-सत्याग्रहादि उपायहि योजूं' असें वारंवार म्हणतात.[1] सनदशीर मार्ग कष्टाचा व कालावधीचा आहे आणि सत्तासंपादनाची तर घाई झालेली आहे. अशा स्थितींत संप-सत्याग्रहाचीच कांस महत्त्वाकांक्षी पक्षांना धरावीशी वाटणार हें उघड आहे. आपल्या बाजूला लोकांना वळवून घ्यावें, त्यांना आपला कार्यक्रम समजावून सांगावा व मतदारांचा आपणाला जाणता पाठिंबा मिळवावा हा सनदशीर उपाय झाला. संप-सत्याग्रह करून असंतोष भडक-

१ दि. १९–९–५० च्या 'केसरी'तील श्री. ना. ग. गोरे यांचा लेख पाहा.

बांवा व तापलेल्या तव्यावर पोळी भाजून घ्यावी हा उपाय सोपा आहे व त्वरित लाभाचा आहे. पण याचेंच आमिष राजकीय पक्षांना विशेष असतें. आर्थिक गाऱ्हाणीं दूर करून घेण्यासाठीं संप करण्याऐवजीं राजकीय उद्दिष्टासाठीं संप घडवून आणण्याचे जे प्रकार आज घडत आहेत त्यांतील इंगित कळणें फारसें कठिण नाहीं. सत्तासंपादनासाठीं सनदशीर मार्गाऐवजीं बेसनदशीर मार्गाचा अवलंब करण्याची प्रवृत्ति वाढत जाणार अशीं लक्षणें आज दिसत आहेत. ही प्रवृत्ति अंतिमदृष्ट्या लोकशाहीला मारक आहे. सनदशीर मार्गाविषयीं सर्वच पक्षांना ( निदान महत्त्वाच्या पक्षांना )जेव्हां आत्मीयता वाटूं लागेल त्याच वेळीं विधिमंडळी लोकशाही ( Parliamentary Democracy ) सुस्थिर होईल, अशी आशा बाळगतां येईल.

## भाषावार राज्यरचनेची आवश्यकता

आपले मतदार शहाणे व्हावे म्हणून स्थानिक स्वराज्यसंस्थांचा प्रसार अधिक होणें जरूर आहे. स्थानिक प्रश्न हेहि महत्त्वाचे आहेत व त्यांच्याविषयीं लोकांना विशेष आत्मीयता वाटत असते; ज्ञानाच्या व अनुभवाच्या परिमित अशा अवस्थेंत त्यांच्यासंबंधींच स्पष्ट विचार करण्याची शक्ति लोकांत असते; म्हणून स्थानिक प्रश्नांना शून्यवत् लेखणें शहाणपणाचें नाहीं, ही गोष्ट आपल्या येथें अजून मान्यता पावली नाहीं. लोकांना विचार करण्याची संवय लागणें व विचार करण्यांत रस वाटणें, हें लोकशाहीच्या उत्कर्षासाठीं जरूर आहे. भाषावार राज्यरचना झाल्यावांचून स्थानिक प्रश्नांना महत्त्व प्राप्त होणार नाहीं आणि केंद्रीय महत्त्वाच्या विषयांसंबंधीं पुरेसें ज्ञान नसल्यानें व आत्मीयताहि नसल्यानें लोकांकडून त्यांचा विचारहि फारसा होणार नाहीं. भाषावार राज्यरचना न केल्यास लोकांची वैचारिक वाढ खुंटण्याचा धोका स्पष्ट आहे. निरक्षर लोकांना राज्यव्यवहारांत बौद्धिक रस ( intelligent interest ) वाटूं लागावा म्हणून भाषावार राज्यरचना होणें जरूर आहे. विचार करण्याची संवय लोकांना लागल्यावांचून लोकशाही यशस्वी होणें कठिण आहे. भाषावार राज्यरचना झाल्यावर पक्षोपपक्षांचे कार्यक्रमहि अधिकाधिक स्पष्ट स्वरूपांत जनतेसमोर ठेवण्याची जरूरी भासूं लागेल. लोकांना ज्या प्रश्नासंबंधीं ज्ञान किंवा अनुभव आहे त्या प्रश्नासंबंधीं तरी पोकळ व आकर्षक घोषणांचा प्रभाव पडणार नाहीं. आपल्या देशांत स्वीकारलेली लोकशाही लोकांच्या पचनीं पडावी असें वाटत असल्यास भाषावार राज्यरचना अवश्यमेव झाली पाहिजे. निरक्षर मतदारांना लोकशाहीचें शिक्षण देण्यासाठीं ही गोष्ट अगदीं जरूर आहे.

महत्त्वाकांक्षी राजकीय पक्षांची दृष्टि बेसनदशीर मार्गाकडे वळणें व स्पष्ट आणि व्यावहारिक कार्यक्रमांची आंखणीच न होणें हे दोन धोके प्रौढमतदानपद्धतींत ( मतदार निरक्षर असतांना ) अनुस्यूत आहेत. ह्या दोन धोक्यांची तीव्रता कमी करणें राजकारणी लोकांच्या हातांत आहे. हे दोन धोके टाळण्याची जबाबदारी सर्वस्वीं त्यांचीच आहे. एक गोष्ट मात्र पार्लमेंट करूं शकेल. विधिमंडळाचा सदस्य होण्यासाठीं शैक्षणिक लायकी ठरवून निदान विधिमंडळें तरी अज्ञानी व निरक्षर लोकांनीं काबीज करूं नयेत असें केलें पाहिजे. असें न केल्यास 'वासरांत लंगडी गाय शहाणी' या न्यायानें सामान्य प्रतीचीं माणसेंहि महत्त्वाच्या जागीं विराजमान होण्याचा धोका आहे. अपक्व बुद्धीचे राज्यकर्ते राज्य करूं लागल्यास लोकशाही हा 'अकार्यक्षमतेचा–नालायकीचा पंथ' (the cult of incompetence ) आहे असें लोकांना वाटूं लागेल व लोकशाही धोक्यांत येईल.

———










## महाराष्ट्र-सूक्त

'What God combines
and synthesises
Wherefore should man
insist on divorcing'
—Sri Aurobindo

नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं
भूमा त्वेव विजिज्ञासितव्यः
——छांदोग्य. ७·२३

मूर्त पावलें अद्भुत गूढ
फुलला फुलला अजान-वृक्ष
जीवा-भावाची साक्ष :

निवृत्त मौनीं प्रवृत्त ज्ञानीं
सामरस्य रचि सोपान
क्रम-मौक्तिक दैवी गान;

पुंडरीक-कर-मुकुलीं प्राण
विठ्ठल तिष्ठत बे-भान
शिव-मुकुटीं विलसे आन—

नाम गजरले, नाथ बहरले
तुका तुकवि अपुली मान
दासबोध होत प्रमाण;

महामूर्ति ही महाराष्ट्राची
जागी झाली चिदंबरीं
अमृत अमृत लहरी लहरी—

सह्यशिखरिंचें ज्योतिर्लिंग
प्रकट जाहलें अष्टांग
त्याला माझा साष्टांग.

——दत्त. राम. बेन्द्रे

## ज्ञानेश्वरा

ते दगड खुणेचे
शतकांचेंही गेले
तव अमृत वाणी
अजुनि रसिकमुखि घोळे !
अद्यापि लाघण्या
प्राकृत-भाषा-लेणीं
ते शरण रिघतसूं
तुझ्याच आम्ही चरणीं
एकेक शब्द तव
अमृतपैजा जिंकी !
विश्वास सार्थ रे,
कोण तया आशंकी ?
तीं गहन वनें
तोडुनी देवभाषेचीं
प्रासाद मराठी
सुरम्य उभविसि तूंची.
उजळतां ज्ञानरवि
त्या मंदिर भागांत
जननयनांपुढलें
सहजाचि लोपे ध्वान्त
खोलून ज्ञानभांडार
जनीं लुटवीसी
समतेची शिकवण
तूंच अम्हांला देशी
तूं सुपुत्र पहिला
असशि मायभाषेचा
तूं गुणेंहि पहिला
असशि, राहशिल साचा !

——वसन्त पिटके

## अश्वत्थामाच ठरला चिरंजीव!

ऐन रात्रींच
लुकलुकणाऱ्या
हिरवट डोळ्यांनीं
कागदावरील
पासल्या पृथ्वीवर
रोखिली दृष्टी;
आणि घेतला
निकाली निर्णय.
......धडधडणारे
दणकट रणगाडे
रांगत रांगत
ओसाड टेकडीच्या
शिरले कुशींत
फोडीत टाहो
तोफांच्या तोंडांनीं :
'रक्त दे';
'रक्त दे'.
......जवळच्या खेड्यांत
दचकून किंचाळला
कोंवळा सांगाडा
क्षयी अस्थींच्या
निःसत्त्व कुशींत;
आणि शिरली
( सुप्त मनाच्या
सहज प्रेरणेनें )
उपाशी ओठांत
जिवंत कातड्याची
विशाविशीत पिशवी.
......उगवत्या रवीला
विजयी सेनेची
झडली सलामी !
......लाजत, लाजत
उगवला सूर्य.
लाल; लाल;
कारण शेवटीं
अश्वत्थामाच
ठरला चिरंजीव !

—विंदा करंदीकर

## कोंडमारा

एकाएकीं मजलागीं
लागलासे श्वास
एकाएकीं वाटूं लागे
जीवन उदास...
कधीं काळीं फुललेल्या
जीवनाच्या आशा
कोमेजल्या, शीर्ण झाल्या
राहिली निराशा.
माझ्या मुखावर ठेवी
कोणी तरी हात;
कुणीं गुंतविलें पद
माझें शृंखलांत.
माझें मनोगत मला
बोलायाची चोरी
माझ्या आंसवां मी घाली
हास्याची रांगोळी !
आंत कोन्दाटले बोल
गुदमरे श्वास
जीवनाचा कोंडमारा
वाहती निःश्वास...

—वसंत मोहरील



अनुक्रमणिका

श्री. ह. कृ. मोहनी

# नाशिक काँग्रेसची फलश्रुति

नाशिक येथील काँग्रेसचें अधिवेशन फार महत्त्वाचें होतें, आणि देशाच्या पुढील भवितव्याच्या दृष्टीनें तें चिरपरिणामी होईल असा रंग दिसत आहे. काँग्रेसमधील प्रस्तुतच्या घटना आगामी काळांत अत्यंत अर्थपूर्ण ठरणें अगदीं स्वाभाविकहि आहे. कारण काँग्रेसची संघटना हिंदुस्थानांतील राजकारणाच्या दृष्टीनें पाहतां अतिशय प्रभावी व अतुलनीय आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. हिंदुस्थानास स्वराज्यप्राप्ति झाल्यानंतर गेल्या तीन वर्षांत काँग्रेस संघटनेमध्यें परिस्थितिप्राप्त अशीं अनेक महत्त्वपूर्ण स्थित्यंतरें घडून येत आहेत. काँग्रेसचें परिवर्तन सारखें चालूं आहे; आणि नाशिक येथील अधिवेशनहि ह्या परिवर्तनांतील एक महत्त्वाचा दुवा आहे. हिंदुस्थानांतील प्रांतीय व केंद्रीय मंत्रिमंडळें ह्या काँग्रेसच्या परिवर्तनशीलतेमुळेंच बनविलीं गेलीं आहेत. अथवा काँग्रेसचें परिवर्तन झाल्यामुळें तीच हिंदुस्थानांत सांप्रत राज्य करीत आहे असेंहि म्हटल्यास त्यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. म्हणून ज्या संघटनेवर प्रस्तुतची राज्यसंस्था अवलंबून आहे, त्या संघटनेचें महत्त्व अपरंपार असावें ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. विशेषतः देशापुढें जगड्व्याळ अशा सार्वत्रिक निवडणुका उभ्या ठाकलेल्या आहेत. तीन कोटींवरून अठरा कोटींपर्यंत मतदारांची संख्या गेलेली आहे. प्रथमच देशांत नवीनच बनविलेल्या स्वराज्यघटनेनुसार प्रौढमतदानास आरंभ होणार आहे. हिंदुस्थानच्या राजकारणाच्या दृष्टीनें ही अभूतपूर्व अशी ऐतिहासिक घडामोड आहे. ज्या राजकीय संघटनेच्या शक्तीवर, दूरदर्शित्वावर, चातुर्यावर व शहाणपणावर ह्या असंख्य मतदारांस दिशा लागणार आहे, ज्या संघटनेच्या सामर्थ्यावर व कार्यकौशल्यावर स्वतंत्र हिंदुस्थानची पुढील राज्यसंस्था अवलंबून आहे, त्या संघटनेचें भवितव्य काय, ह्या प्रश्नाकडे अखिल हिंदुस्थानचें लक्ष वेधावें, हें क्रमप्राप्तच आहे.

नाशिकचें काँग्रेसचें अधिवेशन हें आगामी सार्वत्रिक निवडणुकीपूर्वीचें अधिवेशन होतें. ह्या दृष्टीनें ह्या अधिवेशनाचें अत्यंत महत्त्व आहे असें हिंदुस्थानाच्या सामान्य नागरिकासहि वाटत होतें. ह्या अधिवेशनाचे अध्यक्ष कोण होणार, ह्याबद्दलचें मनस्वी कुतूहल आगामी निवडणुकीच्या वातावरणामुळेंच सगळीकडे निर्माण झालेलें होतें, असेंहि म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. नाशिक काँग्रेसच्या अध्यक्षाच्या निवडणुकीवरून काँग्रेससंघटनेमधील महत्त्वाच्या सभासदाच्या विचारांचें ओझरतें तरी दिग्दर्शन होऊं शकेल असा अंदाज करण्यांत येत होता. ह्या अध्यक्षीय निवडणुकीवरून आगामी राज्यसंस्था कशी बनूं शकेल हेंदेखील कांहीं अंशीं सूचित होण्यासारखें आहे असेंहि वाटत होतें. आणि म्हणून नाशिकच्या अधिवेशनाकडे काँग्रेसच्या सभासदांचें पूर्वीं कधींहि लागलें नाहीं इतकें लक्ष लागलें होतें.

ज्या अर्थीं आगामी राज्यसंस्था बनविणाऱ्या निवडणुकीपूर्वींचें हें महत्त्वाचें अधिवेशन होतें आणि ज्या अर्थीं ह्या निवडणुकीच्या वातावरणाचा इतका प्रभाव ह्या अधिवेशनावर पडलेला होता, त्या अर्थीं ह्या अधिवेशनाचें अध्यक्षपद एकविचारानें देशभर प्रभुत्व चालविणाऱ्या काँग्रेसच्या नेत्यांनीं ठरवावयास पाहिजे होतें, असें कोणाहि विचारी देशभक्तास








वाटलें असेल. कोणत्याहि प्रातिनिधिक संस्थेंत निवडणुकी ह्या केव्हांहि योग्य व समर्थनीयच आहेत हें तत्त्व जरी खरें असलें तरी प्रातिनिधिक उच्च तत्त्वें आपल्या समाजांत खोल गेलेलीं नाहींत, निवडणुकीकडे तात्त्विक ध्येयवादी दृष्टीनें बहुसंख्याक सभासदांस पाहतां येईल इतकी त्या सभासदांची नैतिक पातळी उन्नत झालेली नाहीं, हा देखील सगळ्यांच्या प्रत्ययास येणारा दररोजचा अनुभव आहे. आणि म्हणून कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीमुळें देशांतील एकंदर वातावारण व कॉंग्रेसमधील बहुसंख्याक सभासदांची हृदयें कलुषित झाल्यावांचून राहणार नाहींत हें पूर्वीच लक्षांत घेऊन, देशावर आधिपत्य चालविणाऱ्या देशधुरीणांनीं, ही निवडणूक अशा कठिण प्रसंगीं एकमतानें होईल अशी खबरदारी घ्यावयास पाहिजे होती. ही खबरदारी त्यांनीं घेतली नाहीं. त्यामुळें आपल्या देशांतील उच्च श्रेणीच्या देशभक्तांचें धुरीणत्व देशाच्या आणीबाणीच्या काळांतहि बावनकशी ठरूं शकत नाहीं असा प्रत्यय आला आहे. प्रातिनिधिक थोर तत्त्वाच्या कसोटीच्या दृष्टिकोनांतून पाहतां ही घटना खेदजनक आहे. पण आपल्या लोकशाहीविषयक असंस्कृतपणामुळें ह्या खडतर अनुभवांतून जाण्याखेरीज आपल्या देशास गत्यंतर नाहीं असें मानून कसें तरी मनाचें समाधान करून घेणें भाग आहे.

जेव्हां अध्यक्षीय निवडणूक एकमतानें होण्याची अत्यंत गरज, तेव्हां अध्यक्षीय निवडणुकीसाठीं तीन सुप्रसिद्ध देशभक्त पुढारी उभे राहिले. बाबू पुरुषोत्तमदास टंडन ह्यांना उत्तर प्रदेशांत जरी राजर्षि अशी पदवी दिली गेली असली तरी त्या प्रांताच्या कायदे-कौन्सिलाच्या अध्यक्षपदाव्यतिरिक्त अखिल भारतांत त्यांची ख्याति दुमदुमलेली आहे असें म्हणतां येत नाहीं. हिंदी व हिंदुस्थानी ह्या वादांत त्यांची भूमिका लोकपरिचित आहे. कॉंग्रेसचे एक सुप्रतिष्ठित चारित्र्यवान् कार्यकर्ते व प्रांतीय पुढारी म्हणूनच त्यांची सर्वसामान्य ओळख भारतांत आहे. आचार्य कृपलानी हे त्यांच्यापेक्षां कॉंग्रेसविषयक कर्तृत्वाच्या दृष्टीनें पाहतां अखिल हिंदुस्थानांत अधिक मशहूर आहेत. एकदां तर त्यांनीं कांहीं काळ अध्यक्षपदाची गादीहि विराजमान केलेली होती. महात्मा गांधींच्या हयातींतच त्यांची साक्ष ठेवून मंत्रिमंडळांतील प्रमुख व्यक्तींच्या धोरणाशीं प्रामाणिक मतभेद झाल्यामुळें त्यांनीं अध्यक्षपदहि झुगारून दिलें. कॉंग्रेसच्या चिटणिसाचें स्थान अनेक वर्षें निरलसपणानें व स्वार्थत्यागानें त्यांनीं मंडित केलें होतें. जाज्वल्य स्वाभिमान अंगीं बाळगणाऱ्या अशा पुढाऱ्यानें पुनः अध्यक्षपदासाठीं, महामंत्री पंडित जवाहरलालजींची संमति व पाठिंबा गृहीत धरून निकटवर्ती इष्टमित्रांच्या आग्रहामुळें का होईना धडपड करावी हें बरेंच चमत्कारिक दिसलें असें त्यांच्याबद्दल आदर बाळगूनहि म्हणतां येईल. ह्या दोघांहि कॉंग्रेस-पुढाऱ्यांचा सध्यांच्या मंत्रिमंडळाशीं, मंत्रिमंडळच्या धोरणाशीं, त्यांच्या राजकारणी दृष्टिकोनाशीं एकजीव झालेला नाहीं हें प्रसिद्धच आहे.

टंडनजींनीं एकट्यानें घटनापरिषदेमध्यें हिंदी-हिंदुस्थानीच्या प्रश्नांत रोमन आंकड्याच्या क्षुल्लक बाबीच्या संबंधानें आपला हट्ट चालविलाच होता! द्विखंड हिंदुस्थान सर्वपक्षीय प्रमुख पुढाऱ्यांनीं बहुतांशीं मान्य केल्यानंतर देखील आपल्या एकट्याच्या बळावर अखिल-भारतीय-कॉंग्रेस-कमिटीमध्यें टंडनजींनीं द्विखंड हिंदुस्थानाला विरोध केलेला आहे. संयुक्त प्रांतांत असहकाराच्या आंदोलनांत कायदेभंगाची चळवळ करबंदीपर्यंत नेऊन भिडविण्यापर्यंत त्यांनीं स्वमताचा आग्रह दाखविलेला आहे. व्यवहार्यता व तडजोड त्यांच्या अंतःकरणांत सहजतेनें रुजूं शकेल, असे त्यांचे स्वभावविशेष दिसून येत नाहींत. कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं उभे राहिलेले हे दोन पुढारी आपलीं व्यक्तिगत मतें, सिद्धान्त व निर्णय ह्यांसंबंधीं प्रमाणाबाहेर अस्मिता बाळगून आहेत असें त्यांच्या स्वभावाबद्दलचें निदान केल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

प्रत्येक प्रांतांतील कॉंग्रेसची परिस्थिति सध्यां गुंतागुंतीची, गटबाजीनें बुजबुजलेली, वैमनस्य, मत्सर, अहंकार, स्वार्थ ह्या विकारांनीं बहुतांशीं लडबडलेली आहे आणि म्हणूनच कॉंग्रेसचें अध्यक्षपद हा एक प्रकारचा कांटेरी मुकुट आहे. कॉंग्रेसचा अध्यक्ष शीलानें, चारित्र्यानें व सुस्वभावानें ज्याप्रमाणें शंकातीत असला पाहिजे, त्याचप्रमाणें त्याचा प्रभावहि

# नाशिक काँग्रेसची फलश्रुति

साधारणपणें सर्वमान्य असला पाहिजे. तरच ह्या कठिण प्रसंगांत त्याच्या निर्णयांत जरूर तें, प्रसंगीं उपयोगी पडणारें, सामर्थ्य एकवटलेलें दिसेल. स्वभावाचा एकांडेपणा, आग्रहीपणा, हटवाद अशा समयीं कार्यहानि करणारा ठरेल.

पाकिस्तानच्या व हिंदुस्थानच्या हितसंबंधांबाबतचे अनेकविध प्रश्न आज वातावरणांत दुमदुमत आहेत. ह्या प्रश्नांमुळें निरनिराळ्या, विपरीत व विरुद्ध प्रतिक्रिया देशांतील पक्षोपपक्षांत, गटांत व लोकसमूहांत घडून येत आहेत. राजर्षि पुरुषोत्तमदास टंडन ह्यांचा दृष्टिकोन व स्वमतांचा कल ह्या महत्त्वाच्या प्रश्नाबाबतींत नेहरू-सरकारशीं सर्वस्वीं मिळता नाहीं, हा लोकप्रवाद अध्यक्षपदाच्या निर्णयापूर्वींच जगजाहीर झालेला होता आणि त्यांत बरेंच तथ्यहि होतें, ह्यांत कांहीं शंका नाहीं. आचार्य कृपलानी अध्यक्षस्थानाच्या आपल्या राजीनाम्यानंतर काँग्रेससरकारचे कट्टु असे टीकाकार बनलेले होते. त्यांच्या कठोर-व कित्येक प्रसंगीं निरर्गल-अशा टीकांतून असाहि ध्वनि क्वचित् प्रसंगीं निघूं शकत असे कीं आचार्य हे नेहरूसरकारहून अधिक कार्यक्षम असें सरकार निर्माण करण्यास आपणां स्वतःस समर्थ समजतात ! काँग्रेसमधील व्यक्तिगत प्रभावाच्या दृष्टीनें किंवा संस्थांतर्गत संघटनेच्या सामर्थ्याच्या अनुरोधानें विचार करतां आचार्य कृपलानी यांचा दावा असा असल्यास तो निराधार आहे असें कोणाहि तारतम्य जाणणाऱ्यास वाटेल. आपला अधिकार किंवा सामर्थ्य न अजमावतां प्रमाणाबाहेर टीका किंवा धैर्य दाखविणाऱ्यापैकीं हे दोघेहि महाभाग आहेत कीं काय असें, त्यांचे स्वभावविशेष पाहून, वाटल्याखेरीज राहत नाहीं.

अध्यक्षपदासाठीं उभे राहिलेल्या ह्या दोन्ही पुढाऱ्यांच्या मागें केंद्रीय मंत्रिमंडळांतील बड्या अमात्यद्वयांचा पाठिंबा आहे असा डांगोरा पिटविला गेला. एकविचारानें अध्यक्षपदाची निवड होण्याची निकडीची गरज भासत असतांना हिंदुस्थानावर असामान्य प्रभुत्व चालविणाऱ्या दोन प्रमुख व्यक्तींच्या इशाऱ्यावर काँग्रेसचे प्रतिनिधी विभागले जावेत हें स्पृहणीय असें दृश्य नाहीं. केंद्रीय अधिकाऱ्यांचें काँग्रेस-प्रतिनिधींच्या स्वाभिमानास कमीपणा आणणारें हें कदाचित् आक्रमणहि ठरण्यासारखें आहे. ज्या काँग्रेसच्या प्रतिनिधींनीं प्रातिनिधिक उच्च तत्त्वांचा व लोकसत्ताक पवित्र परंपरेचा कसोशीनें पाठपुरावा करावयास पाहिजे, त्यांनींच व्यक्तिगत मोठेपणाखालीं मान तुकवावी हें लोकशाहीच्या नवीन युगास बिलकुल शोभण्यासारखें नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे. अध्यक्षीय निवडणुकीसाठींदेखील मोठ्या नांवांचा, महनीय व्यक्तींचा उपयोग बिनदिक्कत, खुशाल केला जावा ही कारवाई व्यक्तिगत महत्तमतेस खालीं ओढणारी आहे. एवढेंच नाहीं, तर काँग्रेससारख्या नवेतिहास घडविणाऱ्या हिंदुस्थानव्यापी विशाल संघटनेस कमीपणा आणणारीहि आहे असें वाटतें.

परंतु नुकत्याच समाप्त झालेल्या काँग्रेसच्या प्रांतिक निवडणुकीचें जरासें विहंगमावलोकन केलें आणि काँग्रेसच्या सभासदांनीं निवडणुकीबाबत जे लोकशाहीविघातक गैरवर्तनाचे प्रकार अवलंबिले त्यांचीं नमुनेदार वर्णनें किंचित्मात्रहि डोळ्यांपुढें आणलीं तरी असें दिसून येतें कीं, ज्या लोकशाही तत्त्वांवर आमची राज्यसंस्था पुढें चालावयाची आहे, त्या लोकशाहीच्या उच्चतेशीं व पावित्र्याशीं काँग्रेसच्या सभासदांची तोंडओळखहि झालेली नाहीं ! अध्यक्षीय निवडणुकीबाबत पंडित नेहरू व सरदार वल्लभभाई कितपत जबाबदार आहेत हें खोलांत जाऊन पाहण्याची कांहीं जरूरी नाहीं. पण त्यांच्या थोरवीचा व उच्चाधिकाराचा जो फायदा ह्या निवडणुकीसाठीं घेतला गेला, त्यानें लोकशाहीच्या सामान्य तत्त्वांसहि बाध येतो ह्यांत कांहीं शंका नाहीं. काँग्रेसच्या कार्यक्षम ( qualified ) व क्रियाशील ( effective ) सभासदांबाबतचा उद्वेगजनक पाढा वाचण्यांत कांहीं अर्थ नाहीं. काँग्रेसच्या सभासदांची नैतिक पातळी इतकी खालीं आली आहे कीं, 'हरिजन 'च्या संपादकास, कोणीहि प्रामाणिक मनुष्य काँग्रेसचा सभासद होण्यास कचरेल, असें म्हणावेंसें वाटत आहे ! ही लोकशाहीविषयक पवित्रतेच्या दृष्टीनें काँग्रेसची किती तरी अधोगति आहे ! आंध्र देशासारख्या मोठ्या प्रांताचीं मतें काँग्रेसच्या अध्यक्षपदाच्या








निवडणुकीसाठीं विचारांतच घेणें शक्य झालें नाहीं इतकी तेथील गटबाजी विकोपास गेली आहे ! ती विचारांत घेतली गेली असती तर सांप्रतच्या अध्यक्षाच्या निवडणुकीच्या यशाचें पारडें वरखालीं लागलेंच झालें असतें इतकें हें अध्यक्षीय निवडणुकीचें यश सूक्ष्म, हलुवार व नाजुक ठरलेलें आहे !

काँग्रेसमध्यें जी वशिलेबाजी शिरलेली आहे, केंद्रीय सत्ताधीशांकडे ज्या स्वार्थी, महत्त्वाकांक्षी व सेव्यसेवकवृत्तीच्या आशाळभूतपणानें पाहण्यांत येत आहे, प्रांतिक मंत्रिमंडळें व काँग्रेसपदाधिकारी यांच्यामध्यें अधिकारपदप्राप्तीसाठीं जी चुरस, जो मत्सर, जो भांडकुदळपणा दिसून येत आहे, त्याचें प्रतिबिंब काँग्रेसच्या अध्यक्षपदाच्या बाबतींतहि पडलेलें दिसावें, हा देखावा काँग्रेसच्या पुढील उन्नतीबद्दल आशादायक आहे असें म्हणतां येणार नाहीं.

ह्या प्रकारच्या खालच्या पातळीच्या निकृष्ट प्रचारकी वातावरणापासून काँग्रेसच्या अध्यपदासाठीं उभे राहिलेले तिसरे उमेदवार श्री. शंकरराव देव हे बुद्धिपूर्वक व कटाक्षानें अलिप्त राहिले, ह्यांतच त्यांची लोकशाहींतील पावित्र्य राखण्याची तत्परता, त्यांची तत्त्ववादी वृत्ति, ध्येयदृष्टि आणि त्यांचा स्वाभिमान दृग्गोचर होतो. राजर्षि टंडन व आचार्य कृपलानी ह्यांच्यापेक्षां किती तरी पटींनीं अधिक असा त्यांच्या मतांचा मिलाफ, प्रस्तुत राज्यसंस्थेच्या धोरणाशीं झालेला होता. काँग्रेसला घटनात्मक दृष्टीनें ध्येयवादी उजाळा देण्याचा प्रयत्न त्यांनीं अहर्निश गेलीं तीन वर्षें केलेला आहे. महात्मा गांधींनीं आंखून दिलेल्या लोकसेवकसंघाचें स्वरूप काँग्रेसला शक्य तितकें मिळवून देण्याची आटोकाट खटपट त्यांनीं केलेली आहे. गांधीवादी रचनात्मक कार्यकर्त्यांचा आर्थिक विचार महाप्रयासानें केंद्रित करून सर्वोदयी आर्थिक योजना तयार करविण्याच्या कार्यांत श्री. शंकरराव देव ह्यांनींच पुढाकार घेतला आहे. काँग्रेसकडून आर्थिक नियोजनाबाबतचे ठराव करवून घेऊन केंद्रीय मंत्रिमंडळाकडून आर्थिक नियोजनसमिति नेमून घेण्याच्या कार्यांत श्री. शंकरराव देवांचेच परिश्रम कारणीभूत झालेले आहेत. इतर अनेक प्रांतांशीं तुलना करतां, महाराष्ट्र–प्रांतिक–काँग्रेस–कमिटी एकजिनसी, सुसंघटित आणि कार्यक्षम ठेवण्याचें श्रेय श्री. शंकरराव देव यांच्याकडेच प्रामुख्यानें जाण्यासारखें आहे. अध्यक्षपदासाठीं इतर प्रांतांत झालेल्या धालमेलींत महाराष्ट्रानें आपली बुद्धि विचलित होऊं न देतां श्री. शंकररावांसच एकजात मतें दिलीं असावींत असें दिसतें आणि हेंच श्री. शंकररावांचें अभिनंदनीय यश आहे असें म्हणतां येतें. अनेक वर्षांचें वर्किंग-कमिटींतील त्यांचें सभासदत्व, चिटणीस म्हणून गेल्या तीन वर्षांतील त्यांचें निरलस कार्य, काँग्रेसमध्यें सोज्ज्वळपणा, स्थैर्य व संघटितपणा निर्माण व्हावा या हेतूनें त्यांनीं ध्येयवादी दृष्टीनें केलेला अविरत उद्योग, ह्यांकडे पाहिल्यास अध्यक्षपदासाठीं त्यांची उमेदवारी समर्थनीय होती हें कबूल करणें भाग पडतें. हे तिन्ही उमेदवार प्रथम श्रेणीचे नव्हते, हा कमीपणा वाटत असल्यास बहुतांशीं सर्वांस तो सारखाच लागूं पडेल असेंहि म्हणतां येईल.

काँग्रेसच्या अध्यक्षीय निवडणुकीनंतर ज्या वैचारिक प्रतिक्रिया देशभर निर्माण झाल्या त्यांमुळें पंडित जवाहरलालजींस आपलें धोरण समाविष्ट करणारें एक जाहीर पत्रक काढणें प्राप्त व्हावें, ही घटना काँग्रेसच्या स्थैर्यांत, सामर्थ्यांत आणि शिस्तींत भर घालणारी खास नाहीं. काँग्रेसचे अध्यक्ष आणि प्रमुख राज्याधिकारी ह्यांचे दृष्टिकोन विभिन्न असल्याचेंच हें पत्रक निदर्शक होतें. पंडितजी उत्तर प्रदेशांतीलच पुढारी आणि टंडनजीहि त्याच प्रांतांतील नेते. पंडितजींस टंडनजींच्या निर्णयशक्तीबद्दल आत्मीयता वाटत नसल्याचा त्यांचें पत्रक हा ठळक पुरावाच होता.

नाशिक काँग्रेसमध्यें पंडितजींनीं आपल्या व्यक्तिगत माहात्म्याच्या जोरावर, जनतेवरील आपल्या प्रभुत्वशक्तीच्या सामर्थ्यावर आपल्या धोरणास सर्वस्वीं अनुकूल असे ठराव करून घेतले. तसें झालें नसतें तर देशापुढें गंभीर स्वरूपाचा पेंचप्रसंग निर्माण होणें अपरिहार्यच होतें. काँग्रेस-संघटनेचें महत्त्व आतां निव्वळ देशव्यापी राहिलेलें नाहीं. हिंदुस्थान स्वतंत्र देश झाल्यामुळें आणि काँग्रेसनेंच मंत्रिमंडळें निर्माण केलेलीं असल्यामुळें काँग्रेसच्या






ठरावास जागतिक महत्त्व प्राप्त झालेले आहे, ह्या जबाबदारीची जाणीव काँग्रेसमधील किती व्यक्तींस आहे, ह्याची शंका नाशिकमधील उपसूचनांवरील झालेलीं भरमसाट व बेजबाबदार भाषणें ज्यांनीं ऐकलीं त्यांना येऊन चुकली असेल.

पंडित नेहरू यांना पाहिजे असलेले ठराव जरी नाशिक-काँग्रेसमध्यें पास झाले असले तरी काँग्रेस ही संस्था ध्येयवादी कशी बनवावयाची, काँग्रेसची जनतेवरील नैतिक निष्ठा ढळत चालली आहे हें जाणून काँग्रेसचें जनतेवरील प्रभुत्व टिकविण्यासाठीं काँग्रेसची पुनर्रचना कशी करावयाची, पार्लमेंटरी कार्य किंवा अधिकारलोलुपता ह्यांनीं बहुसंख्याक काँग्रेस-सभासदांच्या हृदयावर जो सर्वांशीं ताबा मिळविलेला आहे त्यापासून त्यांना कसें परावृत्त करावयाचें, काँग्रेसमधील जनसेवावृत्तीच्या सेवकांचें व कौन्सिलांतून कार्य करणाऱ्या लोकांचे संबंध एकमेकांशीं सुसंगत व पूरक असे कसे ठेवावयाचे, हे प्रश्नच काँग्रेसमध्यें आजच्या घटकेस प्रमुख आहेत. पुढील निवडणुका काँग्रेसला कशा जिंकतां येतील, काँग्रेसला बहुमत कसें मिळवितां येईल, हे प्रश्न, वास्तविक पाहतां, अत्यंत गौण, अल्पकालीन व अदूरदृष्टीचे आहेत. ज्या आदरणीय विचारसरणीनें, ज्या ध्येयवादानें, ज्या निष्ठेनें जनता आकृष्ट होऊं शकेल अशी निष्ठा काँग्रेसमध्यें कशी निर्माण करतां येईल हाच मूलभूत प्रश्न काँग्रेसपुढें सांप्रत उभा ठाकलेला आहे. काँग्रेसचें परिवर्तन राजकीय पक्षांत व्हावयाचें असेल तर ह्या पक्षानें कोणतें चिरपरिणामी तत्त्वज्ञान आधारभूत म्हणून स्वीकारावयाचें, हा पक्ष देशव्यापी कसा बनवावयाचा, ह्याचा विचार नाशिक काँग्रेसमध्यें प्रामुख्यानें, कसोशीनें व्हावयास पाहिजे होता. परंतु त्या मूलभूत प्रश्नांस स्पर्शदेखील ह्या काँग्रेसमध्यें झालेला नाहीं. नाशिकचें अधिवेशन हें कार्यदृष्टीनें चोख अधिवेशन ( business session ) व्हावयास पाहिजे होतें. परंतु ह्या आणीबाणीच्या काळांतील काँग्रेस अधिवेशनासहि इतर काँग्रेस अधिवेशनांप्रमाणें मेळाव्याचेंच स्वरूप आलें. कित्येकांनीं ह्या अधिवेशनाबद्दल कांहीं आकांक्षा बाळगल्या असतील. काँग्रेसचें प्रचारकी व प्रक्षोभक ( propagandist & agitational ) स्वरूप मुळींच बदललें नाहीं हें पाहून त्यांची दारुण निराशा झाल्यावांचून राहणार नाहीं. पावसाळी अधिवेशनाचा हा प्रचंड खटाटोप सत्कारणीं लागला असें म्हणतां येत नाहीं.

गांधीवादी विचारसरणीचे विधायक कार्यकर्ते गांधीजींचें कार्य काँग्रेस कितपत आचरणांत आणते ह्या अपेक्षेनें काँग्रेसकडे पाहत आहेत. काँग्रेसचा लोकसेवकसंघ बनावा आणि अशा दृष्टीनें काँग्रेसचें परिवर्तन व्हावें ही आकांक्षा कांहीं देशाभिमानी व्यक्तींच्या हृदयांत जागृत आहे. काँग्रेससारखी इतर कोणतीही संघटना देशांत नसल्यामुळें त्या संघटनेचा उपयोग आपल्या पुढील निवडणुकीसाठीं झाला पाहिजे एवढाच हेतु बहुसंख्य महत्त्वाकांक्षी काँग्रेस-सभासदांच्यापुढें आज जागृत असून ह्याच प्रमुख हेतूनें काँग्रेस-सभासदांचीं हृदयें सांप्रत व्याप्त झालेलीं आहेत. काँग्रेस ही संघटना चिरपरिणामी झाली पाहिजे, तिचें ऐतिहासिक महत्त्व व ध्येयवाद कायम टिकविला गेला पाहिजे, अशी उत्सुकता बहुसंख्य काँग्रेस सभासदांमध्यें तीव्रतेनें दिसून येत नाहीं. ही उत्सुकता काँग्रेसच्या नवीन घटनेच्या स्वरूपांत प्रतिबिंबित होईल अशी आशा कांहीं अल्पसंख्याक काँग्रेस पुढाऱ्यांस वाटत होती. पण हा इच्छित हेतु काँग्रेसची घटना साध्य करूं शकलेली नाहीं. ' विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरं ' असें काँग्रेसच्या घटनेचें स्वरूप सांप्रत बनलेलें आहे.

काँग्रेसच्या घटनेनें विकृत असें स्वरूप धारण केलें असतां आतां काँग्रेसमध्यें ध्येयवादी परिवर्तन कसें घडवून आणतां येईल, हा प्रश्न सोडविण्यावर काँग्रेसचें पुढील आशादायक भवितव्य अवलंबून आहे कदाचित् ही समस्या सोडवितांना काँग्रेसचें सर्वसमावेशक असें सध्यांचें कृत्रिम मानभावी अवगुंठन छिन्नविच्छिन्न होण्याचाहि संभव आहे. परंतु एवढें खरें कीं, ही समस्या सोडविण्यावांचून काँग्रेसचें महत्त्व यापुढें राहूं शकणार नाहीं.



अनुक्रमणिका

# म. जोतीराव फुले : जीवनपट

१८२७ जन्म ( पुणें )
१८३४ मराठी शिक्षणास प्रारंभ
१८४२ इंग्रजी शाळेंत प्रवेश
१८५१ मुलींची शाळा काढली
१८५२ अस्पृश्यांसाठीं शाळा स्थापन केली
१८६३ बालहत्या-प्रतिबंधक गृह उघडलें
१८६४ पुण्यास गोखल्यांच्या बागेंत सारस्वत ज्ञातींतील एक पुनर्विवाह घडवून आणला.
१८६९ ‘ छत्रपति शिवाजी राजे भोसले यांचा पवाडा ’
१८६९ ‘ ब्राह्मणांचें कसब ’ ( पवाडे व अभंग )
१८७३ ‘ गुलामगिरी ’. ‘ सत्यशोधकसमाजा ’ची स्थापना.
१८८५ ‘ सत्सार ’ अंक १, २. ‘ इषारा ’ ( पुस्तिका ). ‘ सत्यशोधकसमाजा ’च्या झेंड्याची मिरवणूक.
१८८९ ‘ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक ’ ( प्रकाशनकाल १८९१ )
१८९० देहावसान ( २७ नोव्हेंबर )

---

## सर्वधर्म-समभाव

“ या भूमंडळावर महासत्पुरुषांनीं जेवढीं म्हणून धर्मपुस्तकें केलीं आहेत, त्या सर्वांत त्या वेळेस अनुसरून त्यांच्या समजुतीप्रमाणें कांहींना कांहीं सत्य आहे. यास्तव कोणत्याहि कुटुंबांतील एका मानव स्त्रीनें बौद्धधर्मी पुस्तक वाचून तिच्या मर्जीप्रमाणें पाहिजे असल्यास तिनें तो धर्म स्वीकारावा, व त्याच कुटुंबांतील तिच्या पतीनें ‘ जुना व नवा करार ’ वाचून त्याच्या मर्जीप्रमाणें पाहिजे असल्यास त्यानें ख्रिस्ती व्हावें. व त्याच कुटुंबांतील त्यांच्या कन्येनें कुराण वाचून तिच्या मर्जीप्रमाणें पाहिजे असल्यास तिनें महंमदीधर्मी व्हावें. आणि त्याच कुटुंबांतील त्यांच्या पुत्रानें ‘ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक ’ वाचून सत्यधर्मी व्हावें आणि या सर्व मातापित्यांसह कन्यापुत्रांनीं आपला प्रपंच करीत असतां प्रत्येकानें कोणी कोणाच्या धर्माचा हेवा करून द्वेष करूं नये आणि त्या सर्वांनीं आपण सर्वांच्या निर्माणकर्त्यानें निर्माण केलेलीं लेंकरें असून त्याच्याच ( निर्मीकाच्या ) कुटुंबांतील आहोंत असें समजून प्रेमानें व गोडीगुलाबीनें एकमेकांनीं वर्तन करावें म्हणजे ते आपल्या सर्वांच्या निर्माणकर्त्याच्या राज्यांत धन्य होतील. ”

—जोतीराव फुले, ‘ सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक ’ – पृ. १२८





प्रा. न. र. फाटक

# जोतीबांची थोरवी

'महात्मा' या विशेषणानें ज्यांच्या नांवाचा उच्चार केला जातो ते कै. जोतिराव फुले यांचा जन्म १८२७ सालीं झाला. आज त्यांचें नांव 'सत्यशोधक' या शब्दाशीं जोडलें गेलें असून सामान्यतः जोतिबा हे ब्राह्मणांचे द्वेष्टे असा एक ग्रह रूढ होऊन बसला आहे व त्याला जोतिबांच्या वाङ्मयांत मुळींच आधार नाहीं असें नाहीं. जोतिबांचीं जीं चार-दोन चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत, त्यांत जोतिबांची कामगिरी सांगण्यापेक्षां ब्राह्मण समाजाच्या कांहीं वास्तविक व अधिक काल्पनिक अशा गुन्हेगारीच्या वर्णनाचा भाग पुष्कळच दृष्टीस पडतो. पण या चरित्रांतुनसुद्धां जोतिबांच्या साह्य-कर्त्यांमध्यें ब्राह्मण असल्याचा निर्देश चरित्रकारांना टाळतां येत नाहीं. जोतिबांच्या कर्तृत्वाचा रोख ब्राह्मणसमाजाला प्रक्षुब्ध करणारा असेल, पण त्यासाठीं ब्राह्मणांना शिव्या देऊन जोतिबांचें चरित्र शृंगारण्याची आवश्यकता नाहीं. ब्राह्मणांनीं रूढ धर्माविरुद्ध कोणी वागतोसा दिसल्यास त्यावर बहिष्कारांचें शस्त्र उगारल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत. बहिष्काराच्या शस्त्राचा उपयोग ब्राह्मणांनीं केवळ अब्राह्मणांविरुद्ध केला असें नसून ब्राह्मणांविरुद्धहि केला आहे. यासाठीं ब्राह्मण-अब्राह्मणांचा कलह या दृष्टीनें जोतिबांच्या चरित्राचा व कर्तृत्वाचा विचार सोडून स्वतंत्रपणें त्यांचा परामर्श घेणें हाच योग्य मार्ग दिसतो.

फुले यांचें शिक्षण फार झालेलें नव्हतें व जें झालेलें होतें त्यावर मिशनऱ्यांच्या मतप्रणालीचा ठसा विलक्षण झालेला होता. फुले यांच्या बालपणीं मिशनरी लोक स्वधर्मप्रचारार्थ बाकीच्या सर्व धर्ममतांचें खंडन करीत असत व त्यांतल्या त्यांत त्यांचा कटाक्ष ब्राह्मणवर्गावरच होता. हिंदु धर्माला त्यांनीं 'ब्राह्मणांचा धर्म' असें नांव दिलें होतें. ब्राह्मणसमाजाविरुद्ध इतर समाजाला चिथरवून सोडण्याची त्याकाळीं मिशनऱ्यांनीं मोहीम चालविली होती. ब्राह्मणांतल्या अनेक जाणत्यांनीं 'ब्राह्मणी धर्म' हा शब्द उचलून हिंदु धर्माच्या भलेबुरेपणाची चर्चा केल्याचे दाखले आहेत. मिशनरी हे वस्तुतः ख्रिस्ती धर्माचे प्रचारक म्हणजे एक प्रकारें ख्रिस्ती समाजांतील ब्राह्मणच म्हणावयाचे. पण त्यांनीं आपली भूमिका विसरून ख्रिस्ती धर्माच्या इतिहासांतील भिक्षुकशाहीचा आरोप हिंदुधर्मांतील ब्राह्मणांवर लादून युरोपांत ख्रिस्ती भिक्षुकशाहीनें ज्याप्रमाणें एकदां तेथील सामान्य जनतेला दडपून टाकलें होतें, त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतहि घडलें असें दाखविण्याचा क्रम स्वीकारला होता. त्या क्रमांत जोतिबा लहानपणीं सांपडल्यामुळें त्यांच्या ब्राह्मणांबद्दल चमत्कारिक समजुती व्हाव्या व त्या त्यांच्या वाङ्मयांत उमटाव्या हें स्वाभाविक आहे. यासाठीं त्यांचें ब्राह्मणांसंबंधांतील धोरण बाजूस ठेवूनच त्यांच्या कर्तृत्वाकडे पाहणें उचित आहे.

## धडाक्यानें कृति करण्याचा स्वभाव

'समाजसुधारणा' या शब्दानें जोतिबांच्या कर्तबगारीचें ध्येय व्यक्त करतां येते. हेंच ध्येय जोतिबांचे समकालीन लोकहितवादी हे जनतेला सांगत होते. परंतु जोतिबांचा विशेष हा कीं, त्यांनीं समाजसुधारणेचा कांहीं तपशील प्रत्यक्षपणें अंमलांत आणला. लोकमत पुरेसें जागृत झालें कीं नाहीं, याच्या अंदाजांत वेळ न घालवितां आपलें ध्येय कृतींत उतरवून

लोकमताच्या कच्चेपक्केपणाची परीक्षा पाहणें, हें त्यांच्या स्वभावाचें वैशिष्ट्य म्हणावें लागतें. १८५१ मध्यें म्हणजे आपल्या वयाच्या २४ व्या वर्षी त्यांनीं मुलींची शाळा स्थापन केली. हें कृत्य कौतुकास्पद निःसंशय आहे; परंतु आश्चर्यकारक नाहीं. अस्पृश्यांकरितां शाळा काढण्याचें जोतिबांनीं केलेलें धाडस हें मात्र निःसंशय आश्चर्यकारक आहे. मुलींच्या शाळा महाराष्ट्रांत निघालेल्या होत्या ह्यांबद्दल जनतेमध्यें अनुकूलता नव्हती. अस्पृश्यांचें शिक्षण हें सामाजिक परंपरेचें अतिक्रमणच होतें. ज्या काळांत ही शाळा जोतिबांनीं अस्तित्वांत आणली, त्या काळीं इंग्रज राज्यकर्त्यांना अस्पृश्यांचा प्रश्न कसा सोडवावा हें कोडें पडलेलें होतें. अस्पृश्य शिकावे ही इंग्रजांची इच्छा, सरकारी शाळांतून अस्पृश्यांच्या मुलांना होणाऱ्या विरोधामुळें सफळ होत नाहीं, असा इंग्रज शाळाधिकाऱ्यांचा अनुभव तत्कालीन शाळाखात्याच्या अहवालांतून पहावयाला सांपडतो. परंतु अस्पृश्यांच्या शिक्षणाची स्वतंत्र सोय करण्याइतकी त्यांच्या शिक्षणासंबंधीं इंग्रजांची कळकळ तीव्र नव्हती. जोतिबांना अस्पृश्यांची होणारी कुचंबणा असह्य वाटल्यामुळें त्यांनीं मुलींच्या शाळेप्रमाणें अस्पृश्यांची शाळा निर्माण केली. कृति करणें हा जोतिबांचा स्वभावविशेष अस्पृश्यांची शाळा धडाक्यानें स्थापण्यांत दिसून येतो.

यानंतर जोतिबांनीं 'बालहत्याप्रतिबंधक गृह' या नांवाची संस्था काढली. विधवा स्त्रियांचें वांकडें पाऊल पडल्यास परिणामीं घडणारी बालहत्या टळावी, असा या संस्थेचा उद्देश होता. याप्रमाणें निरनिराळ्या लोकोपयोगी संस्थांची उभारणी करून त्यावर १८७३ सालीं जोतिबांनीं आपल्या 'सत्यशोधक समाजा'चा कळस चढविला. या समाजाचीं मतें आज सहज सर्वांना मान्य व्हावीं अशींच आहेत. त्यांतील पहिलें ईश्वरविषयक मत जोतिबांच्या आधीं प्रार्थनासमाजानें स्वीकारलें होतें : ईश्वर सर्वव्यापी, निर्विकार, निर्गुण व सत्यरूप आहे; सर्व मनुष्यप्राणी त्याचीं लेंकरें होत; त्याची भक्ति प्रत्येकानें, कुणाच्या मध्यस्थीची वाट न पाहतां करावी. मनुष्याची श्रेष्ठता जातीवर नसून गुणांवर आहे, ही विचारसरणी इंग्रजी कायद्याच्या व्यवहारानें सर्वांच्या मनांवर सहज ठसणारी होती. इंग्रजांनीं अंमलांत आणलेले बरेचसे कायदे हिंदु समाजांतील जातिभेदांचें तारतम्य न बाळगतां सर्वांना अपराधानुसार सारखीच शिक्षा ठोठावणारे होते. इंग्रजांची राज्यकर्ते या नात्याची वागणूक देखील सर्व जातींना समानतेनें लेखणारी होती. नव्या राज्यानें सुरू केलेल्या या समानतेच्या मन्वंतराचा प्रभाव अब्राह्मणांच्या ठिकाणीं संचार करूं लागल्याचें प्रत्यंतर जोतिबांच्या कर्तृत्वानें सर्वांना पटवून दिलें.

## जोतीबांची महती जाणणारे कांहीं ब्राह्मण

ब्राह्मणवर्ग विद्येनें व अधिकारानें इतर सर्व जातींच्या पुढें असल्यामुळें त्याच्यावर घडलेला आणि नव्या सामाजिक सुधारणेच्या व्रतांच्या रूपानें अनुभवास येणारा इंग्रजी राज्याचा परिणाम आश्चर्यकारक नव्हता. पुस्तकी विद्येचा व त्याचप्रमाणें त्या विद्येच्या जोरावर मिळणाऱ्या अधिकाराचा व अब्राह्मणांचा संबंध इंग्रजी राजवटीपूर्वी निराळ्या तऱ्हेचा होता. शिंदे, होळकर, गायकवाड, पवार, आंग्रे, घोरपडे, दाभाडे, धुळप अशीं मराठेशाहींतील अधिकारी पुरुषांचीं नांवें चट्कन् आठवणारीं आहेत. पण त्या राजवटींत पुस्तकी विद्या व अंमलदारी यांची सांगड नव्हती. इंग्रजांच्या राज्यपद्धतींत अधिकार व पुस्तकी ज्ञान यांचें समीकरण झाल्यामुळें अब्राह्मण समाजाची एकदम पीछेहाट झाली. परंपरेची शेतकी किंवा नव्या कारखानदारीची मजुरी असे दोन मार्ग त्या समाजाला मोकळे होते. विद्येच्या बळानें इंग्रजी राज्यांतील सारे कनिष्ठ अधिकार—प्रायः कारकुनी स्वरूपाचे—ब्राह्मणांनीं व्यापले. यांत ब्राह्मणांना दोष देण्याचें कारण नाहीं. इंग्रजांनीं आपल्या गरजेमुळें ब्राह्मणांना हाताशीं धरलें, ही ब्राह्मणांच्या अधिकाराची खरी कथा आहे. परंतु इंग्रजांच्या अशा कृपेमुळें ब्राह्मणांची प्रतिष्ठा वाढली, हें विसरतां येत नाहीं. जोतिबा जेव्हां अब्राह्मण समाजाच्या दैन्यानें कळवळूं लागले तेव्हां त्यांची दृष्टि इंग्रजी राज्यकर्त्याच्या अधिकाराचा बहुजनसमाजाशीं नित्य संबंध घडविणाऱ्या ब्राह्मणांकडे गेली व इंग्रजांच्या गुलामगिरीऐवजीं सगळा समाज ब्राह्मणांच्या



अनुक्रमणिका

गुलामगिरींत आहे, असा त्यांचा ग्रह झाला. धर्मव्यवहारांतील ब्राह्मणांचा वडेजाव, जोतिबाच्या सदर ग्रहाला दुजोऱ्यादाखल उपयोगी पडला व त्यांनीं आपल्या टीकेची दिशा या ग्रहानुसार सिद्ध केली.

आज जोतिबांच्या मृत्यूनंतर ६० वर्षांनीं स्वराज्यसंपन्न काळांत जोतिबांच्या कर्तृत्वाचा विचार करतांना ब्राह्मणांच्या अनुरोधानें विचार करण्याची पाळी यावी, हें एकप्रकारें दुर्दैवाचें म्हणावें लागतें. जोतिबांनीं ईश्वरभक्तीला रोजच्या व्यवहारांत संपूर्ण स्वावलंबनाची जोड देऊन महाराष्ट्रांतील अब्राह्मण समाजामध्यें स्वाभिमान चेतविण्याचा यत्न केला. तसें करतांना त्यांची ब्राह्मणापलीकडे दृष्टि न गेल्यामुळें त्यांच्या शिकवणीचें ब्राह्मणांचा विरोध एवढेंच तात्पर्य शिल्लक राहिलें. वस्तुतः त्या शिकवणींत जीं तत्त्वें सांपडतात, त्यांचा उपदेश ब्राह्मणसुद्धां सर्व जनतेला जोतिबांच्या हयातींत करीत होते. जोतिबांचीं जीं चरित्रें उपलब्ध आहेत, त्यांत ब्राह्मणांना शिव्या असल्या तरी जोतिबांना साह्य करणाऱ्या ब्राह्मणांचीं नांवें त्या चरित्रांच्या लेखकांना गाळतां आलेलीं नाहींत. उदाहरणार्थ, त्यांची मुलींची शाळा ‘ भिडे ’ यांच्या वाड्यांत निघाली. जोतिबांच्या अस्पृश्यांच्या शाळेंत काम करण्याला ब्राह्मण शिक्षक मिळाला. या गोष्टी जोतिबांच्या कार्याला सर्व ब्राह्मणांची सरसकट सक्रिय प्रतिकूलता होती, असें दाखवून देणाऱ्या नाहींत. जोतिबांच्या अस्पृश्यांच्या शाळेचें वर्णन करतांना जोतिबांच्या चरित्रकारांना युरोपियन गृहस्थांबरोबर ब्राह्मणांचीं नांवें दाखल करावीं लागतात. याचा अर्थ जोतीबांच्या समकालीन ब्राह्मणवर्गांत पुष्कळ ब्राह्मण जोतिबांच्या कार्याची महती समजणारे होते, असा स्पष्ट आहे. परंतु एकंदर कालमानाची ओळख टाकून जोतीबांच्या मागें सत्यशोधक समाजाच्या अधूनमधून उदयास येणाऱ्या पुढाऱ्यांनीं केवळ ब्राह्मणांची निंदा एवढेंच आपल्या कामगिरीचें ध्येय ठरविल्यानें इंग्रजी राज्याच्या उभारणींतील भेदनीति सफळ झाली.

### इंग्रजांची भेदनीति

जोतिबांच्या हयातींत महाराष्ट्रामध्यें ज्या राजकीय लोकजागृतीच्या चळवळी झाल्या, त्यांना बहुजनसमाजाचा पाठिंबा प्रथम फारसा मिळाला नाहीं. जोतिबांच्या लेखनांत जे सिद्धान्त आहेत, त्यांत ब्राह्मणांनीं आपला तळीराम गार करण्यासाठीं शिवाजीमहाराजांना मुसलमानाविरुद्ध चिथावून उभें केलें, असा एक सिद्धान्त आढळतो. शिवाजीमहाराजांच्या स्मरणार्थ उत्सव महाराष्ट्रांत काँग्रेसच्या स्थापनेबरोबरच होऊं लागले. त्यांत ब्राह्मणांचाच पुढाकार होता. तेव्हां ब्राह्मणांनीं मुसलमानी राजवटीला शिवाजीमहाराजांमार्फत खो देऊन जो स्वार्थ साधला तोच स्वार्थ त्यांना पुनः शिवाजीमहाराजांच्या उत्सवानें साधावयाचा आहे असा या नव्या चळवळींचा अर्थ करण्यांत आला. काँग्रेसच्या चळवळींत ब्राह्मण आणि व्यापारी यांचें नेतृत्व असल्यामुळें ती चळवळ या विशिष्ट वर्गाचें उखळ पांढरें करण्याकरितां आहे, म्हणून महाराष्ट्रांतील अब्राह्मणसमाजानें तिचा संपर्क टाळण्यांत त्याचें हित आहे अशी कल्पना जोतिबांच्या शिष्यांत रूढ झाली. या दोन्ही गोष्टी इंग्रजी राज्यकर्तृत्वाच्या दृष्टीनें बोधप्रद आहेत. शिवाजी–उत्सव आणि काँग्रेसची चळवळ याविषयीं जी भावना जोतिबांच्या उपदेशक्रमांत दिसते, तिचें काँग्रेसच्या स्थापनेनंतर सर सय्यद अहमद यांनीं मुसलमान समाजाला केलेल्या उपदेशाच्या भावनेशीं विलक्षण सादृश्य आहे. व याचें मूळ इंग्रजी राज्यकर्तृत्वाचा प्रभाव या एकाच गोष्टींत असल्याचें विचारान्तीं कळून येणारें आहे. लोकजागृतीचीं साधनें बोथट करण्याचे जे उपाय इंग्रजांनीं काढले, त्यांत हा एक उपाय होता. आपलें राज्य जाण्याचे दिवस नजीक आले तरी इंग्रज असें म्हणत होते कीं, सामान्य जनता आपल्यावर प्रसन्न असून कित्येक शिकलेल्या असंतुष्ट बेकारांनीं आपल्या राज्यपद्धतीविरुद्ध निष्कारण हाकाटी चालविली आहे. या हाकाटीच्या आहारीं जनता जाऊं नये म्हणून इंग्रजांचा उद्योग सुरू होता. इंग्रज अधिकारी प्रत्यक्षपणें त्या उद्योगांत न दिसले तरी त्यांचे जातभाई, मिशनरी, कॉलेजांतील प्राध्यापक, इतिहासलेखक अशा अनेक नात्यांनीं जुन्या-नव्या लोकस्थितीचा अत्यंत कुशलतेनें विपर्यास करीत होते. या विपर्यासाचीं उदाहरणें देऊन येथें जागा अडविण्याचें कारण नाहीं. ब्राह्मणांच्या हितासाठीं










शिवाजीमहाराजांचा व कॉंग्रेसचा जन्म या कल्पना त्या विपर्यासानें जन्मास घातलेल्या होत्या. त्यांची कांस धरल्यानें फायदा जर कुणाचा झाला असेल तर तो इंग्रजांचाच झाला; त्या विपर्यासापायीं नुकसान मात्र, स्वराज्य मिळालें तरी, भारतीय जनतेला भोगावें लागत आहे व आणखी कांहीं काळ तें भोगावें लागेल.

## ' महात्मा ' हें विशेषण सार्थ

१८३० ते १८९० या कालमानामध्यें दिसून येणाऱ्या महाराष्ट्रीय लोकजागृतीच्या विस्तारांत व उंचींत जोतिबा तुलनेनें उठावदार दिसणारे नसले तरी त्यांचें व्यक्तित्व निराळें काढून त्याचा विचार करूं लागल्यास त्यांतील ठसठशीत गुण डोळ्यांना जाणवल्याशिवाय राहत नाहींत. त्यांतील मोठा गुण म्हणजे तडफदार क्रियाशीलता हा होय. आजूबाजूच्या अनुकूलतेचें किंवा सहानुभूतीचें बलाबल पाहण्यांत वेळ दवडण्याऐवजीं जी गोष्ट मनाला शुद्ध वाटली ती कर्तृत्वानें मूर्तावस्थेस आणून लोकांपुढें उभी करावयाची ही जोतिबांची वृत्ति चिरस्मरणीय तर आहेच, पण अनुकरणीयहि आहे. ब्राह्मणांसारख्या पुढारलेल्या वर्गांतील उत्साही मंडळीला जें धाडस करवलें नाहीं, तें धाडस जोतिबांनीं सफळ करून दाखविलें, या वस्तुस्थितींतील त्यांचें महत्त्व सदैव टिकणारें आहे. हें महत्त्व स्पष्ट होण्यासाठीं आतां विस्मृतीस गेलेल्या 'परमहंस' नामक संस्थेचा वृत्तान्त उपयोगी पडणारा आहे. ही संस्था जातिभेद समूळ नाहींसा करावा असें इच्छिणाऱ्या नवशिक्षित पांढरपेशा तरुणांनीं मुंबईस काढली, तेव्हां मुंबईस ब्राह्मणवर्ग अगदींच थोडा होता. पुण्यास १८४० मध्यें या वर्गाचें जसें प्राबल्य होतें तसें मुंबईस नव्हतें. ' परमहंस ' संस्थेंत कोणीहि अस्पृश्य वर्गाचा इसम नव्हता. सगळे निरनिराळ्या स्पृश्य-वर्गांतले तरुण होते. परंतु त्यांचा कारभार गुप्त रीतीनें चालत असे. १८४० च्या सुमारास या गुप्त कारभाराचा बोभाटा होतांच या तरुणांची दाणादाण उडाली. नंतर सुमारें २७ वर्षांनीं स्थापन झालेल्या 'प्रार्थना-समाजा'त यांतल्या कांहीं तरुणांनीं भाग घेतला. मुंबइसारख्या शहरांत 'परमहंस' मंडळाला ज साधलें नाहीं तें अस्पृश्यांसाठीं पुण्याला शाळा काढून जोतिबांनीं साधलें. त्यांची शाळा १८५२ मध्यें व तीसुद्धां पुण्यासारख्या शहरांत निघावी, याचा विचार करतांना जोतिबांच्या मनाची ठेवण कशी वज्रप्राय दृढ होती याचा परिचय झाल्याशिवाय राहत नाहीं. मुलींची शाळा, बालहत्याप्रतिबंधक गृह यांच्या उभारणींत स्त्रीपुरुषांचा भेद व बालहत्येच्या रूपानें चालणारी अमानुषता यांचें उच्चाटन करण्याच्या उच्च कल्पनांचा अनुभव येतो. आपल्या संस्थेच्या द्वारें हत्येंतून वांचविलेल्या एका मुलाला आपल्या औरसाप्रमाणें स्वतःच्या घरीं जोतिबांनीं वाढविलें व लोकांना मानवतेच्या वात्सल्याचा धडा घालून दिला. सत्यशोधक समाजाच्या तत्त्वचर्चेंत ' महार, मांग, चांभार वगैरे जातीनें अत्यंत खालच्या दर्जाचे म्हणजे नुसत्या स्पर्शालासुद्धां अपात्र समजले जाणारे लोक आपल्याच हाडामांसाचे असून त्यांच्याशीं सर्व प्रकारचा व्यवहार करायला हरकत नाहीं, इतकेंच नव्हे तर आपण तसा व्यवहार बिनदिक्कत करतों ' अशी जोतिबांचीं विधानें दृष्टीस पडतात. जोतिबांच्या मनोगतांतील उदार आणि विशाल साहस या विधानांवरून कळणारें आहे. याप्रमाणें त्यांच्या आचारविचारांची पाहणी केल्यास जोतिबांना महाराष्ट्रांतील गेल्या शतकाच्या लोकोत्तर पुरुषांत ' महात्मा ' या विशेषणानें कां गणावें लागतें, याची वाचकांना अटकळ होईल.

## महाराष्ट्राच्या भूमीचा कांहीं विशेष गुण

जोतिबांच्यासारखे विचार त्यांच्या उदयकाळीं महाराष्ट्रांतील ब्राह्मण व इतर पांढरपेशा वर्गांत खेळत होते. परंतु या वर्गाचें काम केवळ दोन-चार शहरांतून चाललेलें होतें. समाजाच्या खालच्या थराला त्यांची दादहि नव्हती व त्या थरापर्यंत आपले विचार पोंचविण्याचें कार्य जशा नेटानें व्हावयास पाहिजे होतें, तसें वरच्या थरांतील लोकांनीं केलेंहि नाहीं. हें कार्य करावयाला जोतीबासारखा पांढरपेशाबाहेरच्या वर्गांतील एक पुरुष जन्मास येऊन त्यानें इतर कुठल्याहि प्रांतापेक्षां महाराष्ट्राच्या भूमींत कांहीं विशेष व स्वतंत्र गुण असल्याचें निदर्शनास आणून नामदेव-तुकारामांनीं वाढविलेल्या महाराष्ट्राच्या कीर्तीला उजळा दिला. जोतिबा ब्राह्मणविरोधी आहेत या समजुतीनें ब्राह्मणांमध्यें सामान्यतः त्यांच्याविषयीं प्रेमाचा










अभाव स्थिरावला. अब्राह्मण समाजांतहि, धर्माच्या नांवानें चालणाऱ्या परंपरागत आचारांची समाजांतून हकालपट्टी करणारा एक समाजघातकी, पाखंडी म्हणून त्यांना जेवढा मान मिळावा तेवढा मिळाला नाहीं. मध्यंतरीं अनेक वर्षे जोतिबा व त्यांचा 'सत्यशोधक-समाज' यांना बहुतांशीं लोक विसरूनच गेले होते. पंचवीस वर्षांमागें पुण्याच्या भाजीबाजाराचें नांव बदलण्याचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां, जोतिबांनीं धर्मांतर केलें होतें अशा कल्पना काढून, त्या बाजाराला जोतिबांचें नांव न देण्याचा प्रयत्न अब्राह्मणांपैकीं कित्येकांनीं केल्याचें पुष्कळांच्या स्मरणांत असेल. परंतु तो प्रयत्न अयशस्वी झाला. अलीकडे जोतिबांच्या आठवणीबरोबर सत्यशोधक-समाजाचें नांव मधूनमधून जोरानें कानांवर पडत असतें. जोतिबांनीं इहलोक सोडल्याला ६० वर्षें झालीं. या कालावधींत देशांत सर्व तऱ्हेचें, अर्थात् अंतर्बाह्य परिवर्तन घडलें असून प्राप्त स्वराज्याचें नागरिकत्व लोकांमध्यें योग्य प्रकारें वाढण्यासाठीं, जोतिबांनीं आपलें कालमान व ज्ञान यांस अनुसरून व्यक्त केलेल्या विचारांचा जसाचा तसा अनुवाद करण्याचें सोडून ह्या विचारांच्या उगमाचें संशोधन करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. तो उगम मानवी समतेच्या उंचीवर असून अत्यंत शुद्ध समाजशरीरांतील रोगविकार नाहींसे करणाऱ्या सामर्थ्यानें संपन्न आहे. त्या उगमाची उंची व पवित्रता कायम राहून त्याचा प्रवाह समाजाच्या ऐहिक अभ्युदयाला सबळ साह्यकारी होईल, अशी दृष्टि जोतिबांच्या थोरवीचा अभ्यास करणारांनीं बाळगणें आवश्यक आहे.

---

## चोऱ्यामाऱ्या करण्याचा प्रसंग कां येतो ?

" एकंदर सर्व अज्ञानी शेतकऱ्यांसह कारागिरांनीं आपआपलीं मुलें त्यांच्या शाळेंत हट्टानें जर पाठविलीं नाहींत, तर सरकारनें असल्या हेकड लोकांचीं मुलीमुलें शाळेंत शिकविण्याविषयीं बेलाशक सक्तीचा कायदा करावा आणि सरकारी सत्यपाळकांकडून त्या सर्व लोकांस असा बोध करावा कीं तुम्ही आपलीं मुलें जर आपापल्या शाळेंत पाठविलीं नाहींत तर तीं मुलें आळसामुळें उनाड होतील आणि आपलीं पोटें जाळण्याकरितां तीं चोऱ्या करूं लागतील. यामुळें त्यांस सक्तमजुरीची शिक्षा देऊन त्यांच्या पायांत बिड्या घालून त्यांच्या संरक्षणासाठीं सरकारास खबरदारी घ्यावी लागेल. "

—जोतीबा फुले, 'सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक' – पृ. १४७

" आपलें सरकार जर म्हणावें तर 'तें जिकडे घुगऱ्या तिकडे उदय उदय' म्हणणारें आहे. कारण अतिशूद्रांस स्पर्श करण्यास बंदी असल्यामुळें त्यांस सहजच सर्व रोजगारधंद्यांचें द्वार बंद झालें व त्याजमुळें त्यांजवर पोटाच्या आगीमुळें चोऱ्यामाऱ्या करण्याचा प्रसंग गुजरतो."

—जोतीबा फुले, 'गुलामगिरी' – पृ. ९८-९९

श्री. बा. ग. जगताप

# म. ज्योतीराव फुले व धार्मिक गुलामगिरी

म. ज्योतिराव फुले हे मोठे समाजसुधारक होऊन गेले. आपल्या हिंदु समाजाचें चुकतें कोठें हें दाखविणारीं जीं थोडीं माणसें होऊन गेलीं त्यांत म. ज्योतीरावांचा क्रमांक फार वरचा आहे. लोकांना काय वाटेल याची त्यांनीं फारशी फिकीर केली नाहीं. आपल्या बुद्धीला जें वाटतें व अंतः-करणाला जें पटतें तें निर्भीडपणानें बोलण्यामध्यें ज्योतीरावांचें वैशिष्ट्य आहे.

पेशवाई नष्ट झाली. इंग्रजांचें राज्य आलें. समाजांत विचार सुरू झाले. इंग्रजी राष्ट्र हें श्रेष्ठ प्रतीचें राष्ट्र असल्यानें परमेश्वरानें हिंदुस्थानशीं त्याचा संबंध घडवून आणिला, हा एक सुयोगच होय, असें न्या. रानड्यांना वाटलें. पेशवाईमध्यें माणसें कुजूं लागलीं होतीं, तेव्हां पेशवाई गेली, बरें झालें; समाजानें देवाला कृतज्ञताबुद्धीनें हात जोडले, असें लोकहितवादी बोलूं लागले. म. ज्योतीरावांनाहि इंग्रजी राज्य आलें म्हणून वाईट वाटलें नाहीं. झालाच तर फायदा होईल, लोक सुधारतील, त्यांची पीडा नाहींशी होईल, हाच त्यांचा विश्वास होता.

ज्योतीरावांना अखिल समाजाची सुधारणा पाहिजे होती. समाजाच्या वरच्या थरावर जो बुद्धिजीवी वर्ग होता, त्याचेंच तेवढें हित त्यांच्या डोळ्यांना दिसत नव्हतें. म्हणून कित्येक विद्वानांनीं इंग्रज सरकारवर बोटें मोडतांना ज्योतीरावांनाहि दोष दिला.

## इंग्रजी राज्य आणि बहुजनसमाज

इंग्रजांना आपला कारभार प्रस्थापित करावयाचा होता. हिंदुस्थानांत लोकशाही निर्माण व्हावी हा हेतु तीव्रतेनें त्यांचे ठिकाणीं वसत नव्हता. राज्य आपल्याकडे आलें, आतां या हिंदी लोकांना आपण कसें खूष करावें, ही त्यांची दृष्टि होती. सर्व समाजाकडे पाहून त्यांना कांहीं सुधारणा करतां आल्या असत्या. परंतु समाजाच्या वरच्या थरावरील हिंदु व मुसलमान लोकांना खूष करण्याचाच त्यांनीं प्रयत्न केला. मुसलमानांकरितां अलीगड येथें व हिंदूंकरितां बनारस येथें कॉलेजें स्थापन झालीं. संस्कृत भाषा जाणणारे व बोलणारे मूठभर हिंदू असतांना संस्कृत कॉलेज काढण्याची कांहीं जरूर नव्हती. बहुजनसमाज किती अडाणी आहे याची इंग्रजांना कल्पना होती, परंतु त्या समाजाच्या उद्धाराचा मार्ग त्यांना दिसला नाहीं. म्हणून इंग्रज लोक हिंदुस्थानांत राज्य करीत असतांना त्यांनीं लोकशाही निर्माण करण्याचा कधींच प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. १९११ मध्यें ना. गोखल्यांचें प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्याविषयींचें बिल नापास होतें याचा अर्थ काय?

इंग्रज सरकारचा अम्मल सुरू झाला तरी गांवगाड्यांत कांहीं फरक झाला नाहीं. माणसांच्या विचारांत फरक झाला नाहीं. धर्माचें जोखड जें त्यांच्या मानेवर होतें तें तसेंच राहिलें. पूर्वीं विचाराचें स्वातंत्र्य नव्हतें व इंग्रजी अमलांतहि तें लोकांना मिळालें नाहीं. समुद्राच्या पाण्यावर दिसणारा लाटांचा प्रवाह जसा एका दिशेनें वहात असतो, व त्याच्या अगदीं उलट दिशेनें समुद्राच्या पोटांतील पाणी वहात असतें, तसेंच येथेंहि झाल्याचें दिसून येतें. राजकारणामुळें होणारा बदल म्हणजे पृष्ठभागावरील लाटांसारखा आहे. समाजाचा प्रचंड

ओघ हा त्याखालींच दिसून येतो. इंग्रज आले परंतु त्यांनीं जनतेच्या धार्मिक भावनेस हात घातला नाहीं. नाहीं म्हणावयास सतीची चाल बंद करण्या-मध्यें त्यांनीं पुढाकार घेतला; परंतु इतर बाबतींत त्यांनीं मूकव्रतच अवलंबिलें. इंग्रजी राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीनें जरी ही चांगली गोष्ट झाली असली तरी बहुजनसमाजाच्या दृष्टीनें ती वाईट झाली, असेंच म्हणावें लागतें.

## सामाजिक अवनतीला ब्राह्मण जबाबदार

आपला देश आपल्या चुकीमुळें आपण गमावून बसलों, याची जाणीव ज्योतीबांना होती व म्हणून त्यांनीं सर्व समाजाला आत्मनिरीक्षण करावयास लावलें. आपणच आपले खरे शत्रू असतों, हें ते ओळ-खून होते. या अवनतीचें खापर त्यांनीं ब्राह्मण समाजा-वर फोडलें. समाजसुधारणेचें कार्य समाजांतील पुढारी वर्गास करावयाचें असतें, परंतु ही जबाबदारी ब्राह्मणांनीं पाळली नाहीं, असें त्यांचें म्हणणें होतें. ब्राह्मणांच्या ठिकाणीं दांभिकपणा वाढला आहे, समाजाला बरोबर घेऊन चालण्याची त्यांची तयारी नाहीं, खुळ्या धार्मिक कल्पनेचें जड जोखड जनतेच्या मानेवर ठेवून त्यांना त्यांनीं बांधून टाकलें आहे, असा ब्राह्मणसमाजावर ज्योतीबांचा आरोप होता. आपला मोक्ष हा आपण गांठावयाचा असतो; प्रत्येकाच्या कृतीवरून त्याला बरी किंवा वाईट गति मिळत असते; खरा स्वर्ग येथेंच आहे व तो आपल्याला आपल्या प्रयत्नानेंच मिळवावयाचा असतो; ही दृष्टि जनतेला देण्याच्याऐवजीं धर्माच्या नांवा-खालीं काल्पनिक भावी सुखाकडे भाबड्या जनतेचें लक्ष ओढण्याचें पाप ब्राह्मण-समाज करीत आहे, असें ते म्हणत. स्वर्गवासी झालेल्या बापास दूध पिण्यासाठीं गाय पाहिजे, तेव्हां ती गाय ब्राह्मणास दिली म्हणजे वडिलांस पोहोंचती होते, हें जोति-बांना पटेना. देवाची पूजा भटजीनें केली तरी श्रेय यजमानास मिळतें, हेंहि त्यांना कळेना. देव आणि भक्त यांमध्यें दलाल असतां कामा नये, हें मोठ्यानें ओरडून सर्व जनतेला त्यांनीं सांगितलें. मुसलमानी धर्म पुरवला परंतु हा हिंदु धर्म नको; मुसलमानी धर्मामध्यें एकमेकांबद्दल प्रेम आहे, सहानुभूति आहे, तो माणुसकी निर्माण करणारा आहे; आमच्या हिंदु-धर्मामध्यें एकमेकाचा विटाळ एक-मेकांना होतो; एकोपा वाढविण्याऐवजीं जो धर्म समाजाचे तुकडे करतो तो धर्म कसचा, असें त्यांना वाटे. शिवाजीमहाराजांनीं स्वराज्य मिळविलें, परंतु त्यांनीं धार्मिक गुलामगिरी नष्ट केली नाहीं, म्हणून त्यांना वाईट वाटे.

## ज्योतीरावांच्या विचारसरणीचा विजय

समाजाची सुधारणा करण्याचें व्रत कॉंग्रेसनें स्वीकारलें, परंतु त्यांत काम करणारीं माणसें साहेबा-चा पोषाख घालून हिंडणारीं, इंग्रजी बोलणारीं हें पाहून त्यांना विषाद वाटे. ज्या बहुजनसमाजाकरितां सर्व तयारी करावयाची त्या समाजाचा कॉंग्रेसशीं कोणताच संबंध येत नाहीं, हें पाहून आमचे समाज-सुधारक चुकत आहेत, असें त्यांना राहून राहून वाटत असे. ही जाणीव म. गांधींनाहि झाली व कॉंग्रेसच्या बैठका खेड्यांत भरविल्या जाव्यात, असा त्यांनीं आदेश दिला तो त्यामुळेंच.

आतां आपण स्वातंत्र्याच्या युगांत आहोंत. स्वराज्य आपणांस मिळालें आहे. शहरांतील लोकांना तरी जोतिबांचे धर्मविचार पटावयास लागले आहेत. स्वराज्याचें सुराज्य करण्यासाठीं प्रत्येक नागरिकानें प्रयत्न करावयास पाहिजे, हें कळूं लागलें आहे. परंतु खेड्यांपाड्यांत काय परिस्थिति आहे? तेथें पूर्वी-च्याच विचारांचा पगडा जनतेच्या मनावर पडलेला दिसतो. आपल्याला राष्ट्राची संपत्ति वाढवावयाची आहे. आपण स्वतंत्र असलों तरी अजून स्वावलंबी नाहीं. जीवनांत लागणाऱ्या लहानसहान बाबींकरितां देखील दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावें लागत आहे, हें कटु सत्य आहे. यांतून पार पडावयाचें असेल तर दैवावर फारसें अवलंबून न राहतां मनुष्यानें प्रयत्न-वादी बनलें पाहिजे. नवसानें आपली कामना तृप्त होते हे विचार सोडून दिले पाहिजेत. देव आपणांस मदत करण्यास तयार असतो. पण केव्हां? ज्या वेळीं त्यांनीं दिलेल्या सामर्थ्याचा आपण उपयोग करतों त्या वेळीं. आपल्या अंगीं शक्ति असतांना तिचा उपयोग न करतां केवळ आकाशाकडे डोळे लावून जर परमेश्वराची करुणा आपण भाकूं लागलों तर तो कधींहि पावणार नाहीं. आजच्या लोकशाही-

त्या काळांत ज्योतीबांच्या शिकवणीस महत्त्व प्राप्त होणार आहे.

आपला जसा पोषाख तसाच देवाचा; आपले जसें रूप तसेंच देवाचें; आपल्या भावना देखील आपण परमेश्वरावर लादतों; आपल्याला राग येतो तसा परमेश्वरालाहि राग येतो; माणसाला देऊं केलेली वस्तु त्याला मिळाली नाहीं म्हणजे तो रागावतो; त्याचप्रमाणें देवाचा नवस फिटला नाहीं म्हणजे देव रागावतो, या सर्व कल्पना दूर टाकून दिल्या पाहिजेत. देव हा प्रेमळ मातेसमान आहे; प्रेम हाच देव; सर्वांचा देव एक, ही भावना समाजांत आज प्रसृत करावयाची आहे. त्याशिवाय समाजाची उभारणी होणार नाहीं; राष्ट्र निर्माण होणार नाहीं. खेड्या-पाड्यांतून खऱ्या धर्माची शिकवण देणारे समाज-सुधारक आज चोहींकडे फिरावयास पाहिजेत. तरच ' अधिक धान्य पिकवा ' ही मोहीम यशस्वी होईल. तरच समाजशिक्षणाचें रेंगाळत चालणारें काम वाढीस लागेल. ज्या म. ज्योतिरावांनीं विचाराच्या स्वातंत्र्याकरितां आपली हयात खर्च केली, समाजाचा प्रतिकार सहन करूनहि अस्पृश्यतानिवारण व स्त्री-शिक्षण हातीं घेतलें, त्यांच्या शिकवणीस सुयश लाभण्याचे दिवस येत आहेत, हाच त्याचा विजय होय !

---

" आजपावेतों लक्षावधि रुपये विद्याखात्याकडे जरी खर्ची पडले, तथापि त्यांपासून शूद्रांच्या समाजाच्या मानाप्रमाणें त्यांच्यांत विद्वान् लोकांचा भरणा वाढला नाहीं. इतकेंच नव्हे, परंतु महार, मांग आणि चाभांर यांपैकीं कोणी एक शिकलेला कामगार आढळत नाहीं. मग एम्. ए. अथवा बी. ए. औषधास मिळण्याची मारामार. अरेरे ! या सरकारच्या एवढ्या दिगंबर विद्याखात्याच्या गोऱ्या तोंडावर या काळ्या तोंडाच्या भटपंतोजींनीं हा केवढा काळोखाचा डाग लाविला ? अरे ही ' कडूं कारलीं ' आमच्या सरकारनें इतकीं तुपांत तळून साखरेंत घोळून मळलीं, तथापि त्यांनीं आपला जातिस्वभाव न सोडितां ती अखेरीस कडूचीं कडूच राहिलीं. "

—जोतीबा फुले, ' गुलामगिरी ' – पृ. ७१

## आशास्थान

गा सदा मानवा, आशा-गीत जिवाचें<br>
नव विश्व तुझें रे आहे प्रगटायाचें !<br>
रवि-गोल जोवरी नाहीं विझला-मेला,<br>
—ही धरणी आशा-स्थानचि त्या सूर्याला !

--दत्त शंकर कुलकर्णी







श्री. गणेश दामोदर कुडे

# कांहीं लोकगीतें

लोकगीतांकडे, तो एक विसरलेला वाङ्मय-प्रकार म्हणून आपण बघतों. काव्यांत लागणारी प्रमुख गोष्ट म्हणजे भावना, ही आपणांस त्यांत आढळून तर येतेच, त्यांशिवाय कल्पनेचा उत्कृष्ट आविष्कार देखील आपणांस त्यांत आढळून येतो. लोकगीतें प्रत्येक भार्षेत प्रचलित असतात. त्यांचा निर्माता कोण ह्याचें मात्र अज्ञानच आपणांस सगळीकडे दिसून येतें. त्यांत लोकबोलीच्या शब्दांचीच घडण आढळून येते आणि विषय देखील सामान्य जनतेच्या आवाक्यांतलेच असतात.

जात्यावरील लोकगीतांना ज्या चाली किंवा जीं वृत्तें वापरलीं आहेत त्यांत बहुंशानें ओव्यांची संख्याच जास्त दिसून येईल. अर्थात् त्यांच्या निर्मितीचा काळ स्थूल मानानें म्हणा, आपणांस ज्ञानेश्वरानंतरचा म्हणून निश्चित करतां येईल.

मराठीचें आद्य वाङ्मयधन जें आहे तें संतांच्या गोड अभंगांत नि गोड ओव्यांतच भरून राहिलेलं आहे. ह्या लोकगीतांवर विशेषतः जनाबाईच्या नि तुकारामाच्या अनुक्रमें ओव्यांचा व अभंगांचा विशेष पगडा बसलेला दिसून येईल. ओव्या अगर अभंग रचतांना त्या त्या संतांनीं घरगुती आणि सामान्य जनांना परिचित अशा उपमा-अलंकारांची पेरण केल्यामुळें त्यांचा तत्कालीन जनमनांवर विशेष परिणाम घडल्यास नवल नाहीं! पुढील जनाबाईची ओवीच उदाहरणादाखल घ्या.

जनाबाई म्हणे दळूं लाग रे, विठ्ठल
हात कापुराचा पीठ-परिमळ सुटेल.

मीं जीं गीतें साठविलीं आहेत, तीं सारीं जात्यावरचींच आहेत. ह्या गीतांत आपणांस विषयांची विविधता वा विचारांचा एकजिनसीपणा दिसून येणार नाहीं. आजच्या कविता जशा सलग दिसतात तशा त्या दिसणार नाहींत. पण एकाच ओवींत बराचसा अर्थवाहीपणा दिसून येईल. उदाहरणादाखल पुढील ओळी पहा :

कांहीं झाडाखालीं, कांहीं झुडाखालीं
कांहीं वेलाखालीं
रामानें डेरे ग दिले
राम चांदण्या रात्रीं घरीं ग आले

राम परत येत होते लंकेहून. त्यांच्या बरोबर बरीच वानरसेना होती म्हणून डेरे देत, राम घराकडे आले. आतां कवीनें चांदण्या रात्रीं रामचंद्राला घरीं आणलें तें केवळ त्याला चांदण्याचं वेड असावं म्हणून आणि रामाचा रात्रींचा मार्ग सुकर व्हावा ह्यासाठींच! एवढा अर्थ साधारणपणें आपण ग्रहण करूं शकतों.

लोकगीतांचें वैशिष्ट्य म्हणून आपणांस एक गोष्ट दाखवितां येईल कीं, मनाचा मोकळेपणा आणि शब्दांच्या श्रीमंतींतून व्यक्त होणारी मनाची श्रीमंती! स्वागताची भावना व प्रेम किती उत्कट असूं शकतें, ह्याचीं प्रात्यक्षिकें म्हणून आपणांस त्यांच्याकडे बोट दाखवितां येईल. पहा :

माझ्या अंगणांत साधुसंतांची पंगत
चंदनाचा सडा वर मोत्याचा मंडप.

साधुसंताबद्दलचा उत्कट आदर पुढील ओव्यांत देखील दिसून येईल:

माझ्या अंगणांत साधुसंत तोंड धुती
सोन्याचें दांतण मुखीं हिरे झळकती.
देसी देवराया साधुसंताचा शेजार
रात्र नि दिवस हरिनामाचा गजर.
माझ्या अंगणांत साधुसंतांची मंडळी
चंदनाचा सडा वर बुक्क्याची रांगोळी.

संतांनीं बीजें लावलीं त्यांचीं झाडें बरीच वर्षे तग धरून आहेत. अडाणी मनांतून प्रगट होणारें हें आदरसंगीत ऐकलें कीं, मन पवित्र स्मृतींनीं भरून येतें.

माझ्या अंगणांत सोनियाचा चवरंग
आंघोळीला येती पंढरीचे पांडुरंग.

पंढरीच्या पांडुरंगाची भक्ति महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांत भरून राहिलेली आहे. ही सारी कामगिरी संतांचीच होय. यात्रायात्रांतून येणाऱ्या दिंड्या आणि भावभक्तीची प्रचंड गर्जना, चंद्रभागेच्या वाळवंटांतून लोण घेऊन गांवोगांव जातात. महाराष्ट्राच्या भाविक मनाचा कदाचित् हा परिणाम असूं शकेल.

भावाबहिणींचें अकृत्रिम प्रेम, बहिणीच्या भावासंबंधींच्या अपेक्षा प्रगट करतांना त्यांतून आढळून येणारा कमालीचा मोकळेपणा नि भावाचं देखील बहिणीवरचं उत्कट प्रेम, यांत निर्व्याजता आहेच अन् निरपेक्षता देखील !

सुखाला सर्वजण दुःखाला आईबाई
वैद्याच्या घरीं भाऊ घाली पायदळीं !

सुखाला सारेच असतात पण दुःखाला आई-भावाशिवाय कोणीं नसतें असें सासुरवाशिणीला वाटावं आणि—

भाऊ नि बहीण गोष्टी व्हाव्या प्रसंगाच्या
सोन्याची समई, वाती लावा रेशमाच्या !

सोन्याच्या समईत लावलेल्या रेशमाच्या वातींच्या प्रकाशांत भावाच्या श्रीमंतीचें दर्शन येथें होतें.

भाऊ-बहिणींचा तंटा, तेथें नको रागरोस
केशर-कस्तुरीचा त्यांचा असे एक वास

भावाबहिणींचा तंटा तो काय असणार ?

माऊलीवांचून . माया कुणाला सुचेना
पावसावांचून रान हिरवें दिसेना.

पावसावांचून रान हिरवळणार नाहीं तसेंच आईशिवाय कुणाला माया उत्पन्न होणार आहे ? असा व्यक्त होणारा भाव ह्या ओवींत पाहिला म्हणजे आजदेखील यशवन्त अट्टाहासानें 'स्वामी तिन्ही जगाचा आईविना भिकारी' असें कां सांगूं शकतात ह्याचें मर्म ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

दारीं लावलेल्या तुळशी-वृंदावनांतील त्या इवल्या रोपट्याला आज शहरांत पहावें तर गचांडी-च मिळालेली दिसून येईल. पण खेड्यांत मात्र दरवाजाच्या दर्शनी मार्गींच तुळशीचें आसन अजून वृंदावनांत स्थिर आहे व पहांटेच्या वेळीं अजून देखील खेड्यांतील सासुरवाशिणी भक्तिभावानें तुळशीची आराधना करतांना दिसतील. तुळशीचं महत्त्व अजूनहि एखादी सासुरवाशीण गात असते.

माझ्या अंगणांत तुळशी-बाईचा बंगला
देव बालाजीचा मला शेजार चांगला.

तुळस बाई तूं ग आहे घरोघरीं
फैलाव मांडिला पतिव्रता तुझ्या दारीं.
तुळस ग बाई वाळुनिया कोळ झाली
तुझ्या मंजिरीची विठ्ठलाला माळ केली.

तुळशीच्या अन् आर्यस्त्रीच्या परस्परजीवनांत न कळे, कांहीं तरी 'घट्ट जूट' वाटते आणि म्हणूनच तिची महती आळविण्याचा मोह अजूनहि आधुनिक कवींना सुटत नाहीं तो ह्यामुळेंच.

भारतीय संस्कृतीचीं मूल्यें आपणांस ह्या गीतांमध्यें आढळून येतील. किंबहुना हीं गीतें म्हणजेच भारतीय संस्कृति. तीं ऐकूं लागलों म्हणजे काव्याची एक मोठी मेजवानी तर मिळतेच पण मन देखील भावनांच्या आवर्तांत सचैल स्नात होतें.

असल्या ह्या लोकगीतांचं आज हातीं लागलेलें स्वरूप म्हणजे—

यमुनेच्या तीरीं जाऊं बसूं घडीभर
मोती—पोंवळ्यांची नाव आली थडीवर !

असंच नाहीं का ?

———











अनुक्रमणिका

# कै. श्रीधर विनायक वर्तक

मरणं प्रकृतिः शरीरिणाम्
विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ।
क्षणमप्यवतिष्ठते श्वसन्
यदि जन्तुर्ननु लाभवानसौ ।।

अशी कविकुलगुरु कालिदासानें मृताबद्दल शोक करणाऱ्यांची समजूत काढली आहे; आणि तात्त्विक दृष्टीनें ती कोणालाहि पटणार नाहीं, असें नाहीं. पण एखादी गोष्ट समजली तरी ती उमजतेच असें थोडेंच आहे? जो जन्माला आला त्याला मृत्यु हा ठरलेलाच, हें प्रत्येकालाच ठाऊक असतें. पण तो केव्हां आणि कसा यावा याबद्दलहि कांहीं अटकळी आहेत. पण त्या सर्वसाधारण अपेक्षांचा भंग करून मृत्यु जेव्हां एखाद्यावर अकालीं आणि अकस्मात् झडप घालतो तेव्हां, "अहह ! निर्घृणता विधेः !" असे उद्गार कोणाच्याहि तोंडून, मृत्यु अटळ आहे हें कितीहि पक्केपणीं माहीत असलें तरी, निघाल्यावांचून कसे राहतील ?

थोड्या दिवसांपूर्वीं श्री. श्रीधर विनायक वर्तक यांच्या मृत्यूची वार्ता ऐकून किंवा वाचून त्यांच्या प्रत्येक स्नेह्याच्या आणि परिचिताच्या मनाला विजेचा धक्का बसावा तसा जबर तडाखा बसला असेल. माझा तर त्या बातमीवर विश्वासच बसेना. तींत कांहीं तरी गफलत असली पाहिजे, असें मी माझ्या स्नेह्यांना पुन्हां पुन्हां सांगत होतों; आणि त्याला तशींच कारणेंहि होतीं. पण अखेरीस खात्री करून घेण्यासाठीं मुंबईचीं वृत्तपत्रें मागविलीं आणि पाहिलीं तेव्हां मात्र "अशुभ वार्ता खोटी न ठरायाची" याच कटु सत्याचें प्रत्यंतर पटलें !

गेल्या दहा-बारा वर्षांत उदयाला आलेल्या तरुण साहित्यिकांच्या पिढीला श्री. वर्तक यांचा फारसा प्रत्यक्ष परिचय नाहीं. यामुळेंच बहुधा त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्याबद्दल जितकें लिहिलें जावयास पाहिजे होतें तितकें लिहिलें गेलेलें दिसत नसावें. मृत्यूची वार्ता, श्मशानयात्रेचें वर्णन आणि कांहीं थोडें जुजबी परिचयपर लिखाण, हीं तरी निदान मुंबईच्या वर्तमानपत्रांतून छापून आलीं, पण पुण्याच्या वर्तमानपत्रांत तर त्यांच्या मृत्यूची वार्ताहि या घटनेनंतर तिसऱ्या दिवशीं प्रथम अवतरली; आणि तीसुद्धां किती त्रोटक, महत्त्वशून्य रीतीनें ! मग अवांतर गोष्टींबद्दल बोलावयासच नको.

ही उपेक्षा हेतुपुरःसर झाली असेल, असें मात्र नाहीं. कारण तसें होण्याचें कांहीं कारण नाहीं. श्री. वर्तक हे पुण्याचे होते. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजचे ते माजी विद्यार्थी होते. पुण्याबद्दल आणि पुण्याच्या परंपरेबद्दल त्यांना अभिमान होता; आणि कोणत्याहि एकाद्या विशिष्ट राजकीय पक्षाशीं ते कधींहि निगडित नव्हते. पण जनतेची स्मरणशक्ति तोटकी असते, असें म्हणतात तेंच खरें. नाहीं तर पंधरासोळा वर्षांपूर्वीं ज्यांच्या " आंधळ्यांची शाळा " या नाटकाचे प्रयोग पाहून पुण्यांतील सारे रसिक डोलत होते, पुण्यांतील सारीं वृत्तपत्रें स्तुतिस्तोत्रें गात होतीं, त्या श्री. श्री. वि. वर्तकांनीं, ते अलीकडे फारसे प्रसिद्धीच्या प्रकाशांत नसल्यामुळें, पुणेकर विसरले कीं काय, अशी एखाद्याला शंका यावी, इतकी त्यांच्या मृत्यूसंबंधींची उदासीन वृत्ति कां दिसावी ?

असें कशामुळें झालें असेल तें असो, पण श्री. श्रीधर विनायक वर्तक यांचें मराठी साहित्य व मराठी रंगभूमि, या दोन्ही क्षेत्रांतील कार्य असें सहजासहजीं विसरून जाण्यासारखें नाहीं, हें निश्चित. त्यांनीं लिहिलेल्या, "तुतारीचे पडसाद" या केशवसुतांच्या कवितेवरील सर्जनशील समीक्षाप्रबंधाला, मराठी साहित्यांतील टीकावाङ्मयाच्या दालनांत निःसंशय

स्वतःचें आणि स्वतंत्र असें विशिष्ट स्थान आहे. इब्सेनच्या Warriors at Helgeland किंवा Vikings या नाटकाचें ' तक्षशिला ' या नांवानें रूपांतर करून, परकीय भाषेंतील एका महत्त्वाच्या आणि सुंदर नाट्यकृतीचा त्यांनीं मराठी नाट्य-वाङ्मयाला लाभ करून दिलेला आहे. त्यांच्या " आंधळ्यांची शाळा " या नाटकाची लोकप्रियता अजूनहि कमी झालेली नाहीं, याचें प्रत्यंतर, हौशी आणि नाट्यप्रेमी नटसंघ आणि शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी, यांमध्यें त्याचें प्रयोग करण्याची जी अहमहमिका दिसते, तीवरून पटतें; व त्यांच्या ' लपंडाव ' या स्वतंत्र नाटकाबद्दलहि तितक्या उत्कटतेनें नसलें तरी जवळजवळ तसेंच म्हणतां येण्यासारखें आहे. नांव घेण्यासारखीं तीन नाटकें आणि एक उत्कृष्ट ललितसमीक्षाप्रबंध लिहिणें, ही साहित्यक्षेत्रांतील निःसंशय स्पृहणीय कामगिरी आहे. आणि तिच्या कर्त्याची स्मृति ही निखालस उपेक्षणीय किंवा विस्मरणीय नाहीं.

परंतु तशी विस्मृति झाली आहे असा भास होण्याचें कारण श्री. वर्तक हे गेलीं बारा-पंधरा वर्षें दुसऱ्या कार्यक्षेत्रांत गुंतल्यामुळें, साहित्यिक जगांतून जरासे बाजूला झाले होते, हें असणें संभवनीय आहे. पण त्यांनीं साहित्याचें वळण अगदींच सोडलें होतें, किंवा त्यांतून ते निवृत्त झाले होते, असें मात्र नाहीं. क्वचित् कोठें एखाद्या मासिकांत त्यांचा एखादा लेख, नाहीं तर लघुकथा झळके; पण कार्यव्यापृतत्वामुळें त्यांना यापेक्षां साहित्यनिर्मितीसाठीं अधिक वेळ देतां येणें अशक्य होई. मुंबई नगरपालिकेंतील एका वरिष्ठ अधिकाराच्या जागीं गेलीं कांहीं वर्षें ते होते; आणि भरीला सर्वस्वीं स्वतःच्या कल्पकतेनें आणि परिश्रमानें उभा केलेला आणि ऊर्जितावस्थेला आणलेला, साबूचा एक किफायशीर कारखाना त्यांच्या हातीं होता. नगरपालिकेंतील आपल्या त्या अधिकाराच्या पदावर ते आरूढ झाले ते अगदीं खालपासून वरपर्यंत क्रमाक्रमानें पण झपाट्यानें वर चढत चढत; आणि कारखानदारींतहि त्यांनीं बिंदूपासूनच सिंधु निर्माण केला. कचेरी आणि कारखाना या दोन्ही ठिकाणीं त्यांनीं सारखीच लोकप्रियता संपादन केली होती. निःस्पृहता, दानत, औदार्य, शिस्त, समंजस सहानुभूति, अविश्रान्त परिश्रमाची तयारी आणि आपुलकीचा जिव्हाळा, या त्यांच्या स्वभावविशेषांमुळें ते सर्वांनाच हवेसे वाटत. वरिष्ठ आणि कनिष्ठ या दोघांशींहि त्यांचें वर्तन, नेहमीं दोन्ही बाजूंच्या स्वाभिमानाचें संरक्षण होईल अशा रीतीनें, समतोल आणि खेळीमेळीचें असे.

त्यांचें व्यावसायिक जीवन अशा रीतीनें अत्यंत यशस्वी आणि प्रभावी ठरलें खरें; पण त्यांच्या आयुष्यांतील हा कर्तबगारीचा महत्त्वाचा काल, केवळ अर्थार्जनाच्या व्यवहारी कार्यांत खर्चीं पडत राहिल्यामुळें व त्यांना या कालांत साहित्य व रंगभूमि यांकडे लक्ष देण्यास जवळ जवळ मुळींच सवड सांपडली नाहीं. सेवानिवृत्त झाल्यावर, पुन्हां पहिल्याप्रमाणें साहित्य व रंगभूमि यांच्या कामीं आपली सारी शक्ति आणि युक्ति उपयोगांत आणावयाची, असा त्यांचा यापुढचा मनोदय होता. त्यासाठीं कित्येक योजना त्यांनीं आंखून ठेविल्या होत्या; अनेक बेत योजून ठेवले होते.

पण विधिघटना विपरीत होती. ज्या दिवसापासून त्यांनीं निवृत्तिपूर्व रजेची मागणी केली होती, नेमक्या त्याच दिवशीं आकस्मिकपणें त्यांचा मृत्यु घडून आला. अतिश्रमामुळें आणि दम्याच्या वारंवार उसळत्या विकारामुळें, त्यांची प्रकृति क्षीण झालेली होती, हें खरें; पण सेवानिवृत्त होऊन त्यांना थोडी विश्रांति मिळाली कीं, ती सुधारेल अशी, त्यांची मूळची प्रकृति सुदृढ असल्यामुळें, त्यांच्या स्नेह्यांना आणि आप्तांना खात्री वाटे. शिवाय त्यांचा स्वतःचा आपल्या भावी कार्याबद्दलचा उत्साह आणि आशावाद इतका दुर्दम्य आणि प्रभावी असे कीं, त्यांच्या अशाप्रकारच्या अपमृत्यूची शंका वैऱ्याच्याहि मनाला शिवणें शक्य नव्हतें. कचेरी आणि कारखाना यांत गेलीं कित्येक वर्षें ते गढून गेले असले तरी, साहित्य आणि रंगभूमि हेंच आपलें वास्तविक जीवितकार्य आहे, अखेरीस आपणाला स्वतःला त्यालाच वाहून घ्यावयाचें आहे, अशी त्यांची आंतरिक धारणा होती. आणि तिच्या परिपूर्तीची सुरुवात होण्याची संधि अगदीं जवळ येऊन ठेपली होती; किंबहुना नुकतेंच, ज्या जिव्हाळ्याच्य

## कै. श्रीधर विनायक वर्तक

आपुलकीनें त्यांनीं सौ. मुक्ताबाई दीक्षित यांच्या 'जुगार' नाटकाच्या प्रयोगाला सहकुटुंब सक्रिय साहाय्य दिलें, त्यावरून त्या परिपूर्तीची सुरुवात झालीहि होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

श्री. वर्तक हे पुण्याचे खरे, पण त्यांच्या पूर्व आयुष्यांतील बराचसा भाग नागपूर येथें व्यतीत झाला होता. त्यामुळें त्यांच्या मनोरचनेवर पुण्याहूनहि नागपुरी वातावरणाचेंच अधिक वर्चस्व होतें. त्यांचे मामा, कै. नारायणराव वैद्य, यांच्या घरीं त्यांचें बहुतेक शिक्षण झालें. पण आपल्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या चळवळींत पुढाकार घेऊन, अधिकाऱ्यांच्या इच्छेला विरोध करण्याचें धैर्य दाखविल्याच्या अपराधाबद्दल, त्यांना आपल्या इतर कांहीं सहकाऱ्यांबरोबर त्या कॉलेजांतून निघावें लागलें होतें. नंतर पुण्याला येऊन फर्ग्युसन कॉलेजमधून त्यांनीं आपली मुंबई विश्वविद्यालयाची बी. ए.ची पदवी संपादन केली, आणि त्यानंतर थोड्याच दिवसांनीं त्यांनीं मुंबई नगरपालिकेच्या नोकरींत कारकुनी पत्करली.

उपजीविकेसाठीं त्यांना कारकुनी पेशा पत्करावा लागला खरा, पण त्यांचा मूळ पिंड त्या पेशाला सर्वस्वीं प्रतिकूल होता. कॉलेजजीवनांत अधिकाऱ्यांच्या अरेरावीला उघड विरोध करून, त्यांनीं त्याचें प्रत्यंतरही पटवून दिलें होतें; पण त्या वेळीं स्वावलंबी होणें, ही गोष्ट दुसऱ्या कोणत्याहि विचारापेक्षां अधिक आवश्यक असल्यामुळें, मिळविलेल्या पदवीचा उपयोग करून जें लवकरांत लवकर साध्य करतां येण्यासारखें होतें, तें त्यांनीं हस्तगत केलें; आणि त्यांतून बाहेर पडून कांहीं तरी स्वतंत्र आणि लोकोपयोगी असें सामाजिक कार्य करण्याची अनावर ओढ अंतःकरणांत असूनहि, अखेरपर्यंत त्यांना त्यांतच राहावें लागलें. या नौकरीपेशांतहि त्यांनीं स्वतःचें व्यक्तिमत्त्व उत्कटपणें व उत्तम रीतीनें प्रस्थापित केलें यांत मात्र शंका नाहीं.

पण रसिकांच्या अंतःकरणांला उचंबळावयाला लावणारे श्री. वर्तक, हे मुंबई नगरपालिकेच्या कचेरीच्या परिसरांतील कामगार-कारकुनांचे आणि अधिकाऱ्यांचे आवडते यशस्वी अधिकारी वरिष्ठ, किंवा मुंबई शहरांतील घरमालकांना आपलेसे वाटणारे ॲसेसर ॲंड कलेक्टर वर्तक, खास नव्हत. या त्यांच्या हुद्द्यांची रसिकांना क्वचितच माहिती असेल. रसिकांचे आवडते वर्तक म्हणजे 'आंधळ्यांच्या शाळे'चे कर्ते, 'नाट्यमन्वंतरा'चे संस्थापक आणि 'तुतारीच्या पडसाद'चे लेखक, श्री. श्रीधर विनायक वर्तक, हे होत. मराठी साहित्यांत त्यांची स्मृति चिरायु होवो.

—के. नारायण काळे

---

### 'नाट्यमन्वंतरा'चे प्रवर्तक

वयाच्या १२–१३ व्या वर्षी आपल्या शिक्षणाची पुणें येथें आबाळ होत आहे हें लक्षांत येतांच, कोणाला न विचारतां, न सांगतां वर्तक हे नागपूरला आमच्या येथें एकदम निघून आले. अर्थात् माझ्या वडिलांच्या जवळच त्यांचें इंग्रजी पहिल्या वर्गापासून इंटरपर्यंत शिक्षण झालें. ...

...आपल्या समाजांतील स्त्रियांवर व विशेषतः विधवांवर फार अन्याय होत आहे असें त्यांना नेहमीं वाटे, व तो दूर करण्यासाठीं ते हिरीरीनें झटत. वर्तक यांचा पहिला विवाह एका बालविधवेशीं झाला होता. ती वयानें त्यांच्यापेक्षां मोठी. आपल्या नातलगांना व इतर वडील मंडळींचा विरोध पत्करून त्यांनीं त्या विधवेशीं विवाह केला होता. पण दुर्दैवानें त्या बाईचा एक दीड वर्षांतच पोटांतील विकारानें अंत झाला.

...नाटक हा त्यांचा अत्यंत आवडता विषय. स्त्रियांची भूमिका स्त्रियांनींच केली पाहिजे, असा त्यांचा पहिल्यापासून अतिशय आग्रह असे. ते नेहमीं म्हणत कीं, "मला रंगभूमीवर 'हिजडे' नाचलेले पाहवतच नाहीं. स्त्रियांनीं व विशेषतः सुशिक्षित स्त्रियांनीं रंगभूमीवर यायलाच पाहिजे." पण त्या बाबतींतसुद्धां आपल्या समाजामध्यें बोलघेवडेपणा व अंगचोरपणाच जास्त आहे असें दिसून येतांच त्यांनीं आपल्या पत्नीला तयार करून आपल्या मताचा सक्रिय पुरस्कार केला व उभ्या महाराष्ट्रामध्यें नाटकाच्या बाबतींत व स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच करण्याच्या प्रश्नाबाबत मन्वंतर घडवून आणलें.

—ह. ना. वैद्य, बी. ए., एल्‌एल्. बी. (नागपूर)

'तरुण भारत' (नागपूर) च्या २४-१०-५० च्या अंकांतील लेखामधून.

# सारसंकलन

## ‘ साहित्य आणि संस्कृति ’

प्रा. दु. का. संत यांचें ‘ साहित्य आणि संस्कृति ’ हें पुस्तक ( प्रकाशक : प्रा. दु. का. संत शिवाजीनगर, रत्नागिरी, पानें १८० किं. ३ रु. ) नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. श्री. संत यांनीं या पुस्तकांत सांस्कृतिक क्रान्ति घडल्यामुळें साहित्यांत क्रांतिकारक बदल घडून येत असल्याचें ऐतिहासिक दृष्टीनें दाखवून दिलें आहे. ज्या ज्या वेळीं मानवसंस्कृतींत आमूलाग्र क्रान्ति घडून आली त्या त्या वेळीं मानवी जीवनांत आणि मानवी जीवनांचें प्रतिबिंब ज्यामध्यें पडतें अशा साहित्यांतहि क्रांतिकारक बदल झाल्याचें दिसून येतें. आज मानवसमाज अशाच एका क्रांतिकालांत वावरत असून या सर्वांगीण क्रान्तीचें स्वरूप काय असेल अथवा असावें, या सर्वांगीण सामाजिक क्रान्तीमुळें मानवाच्या जीवनमूल्यांत कोणते फेरबदल घडून येत आहेत अथवा यावेत आणि मानवी जीवनांच्या मूल्यांतील हें मूलभूत परिवर्तन घडून आल्याचे परिणाम साहित्यक्षेत्रांत कशा प्रकारचे घडत आहेत, घडणार आहेत आणि घडणें इष्ट आहे, या विषयासंबंधींचें आपले विचार श्री. संत यांनीं या पुस्तकांत विशद केलेले आहेत.

या पुस्तकास आचार्य शं. द. जावडेकर यांची प्रस्तावना आहे. आ. जावडेकर, प्रा. संत यांच्या भूमिकेशीं सामान्यतः सहमत असले तरी त्यांनीं या प्रश्नासंबंधीं आपलें वैशिष्ट्यपूर्ण मत ज्यांत मांडलें आहे, तो प्रस्तावनेचा भाग पुढें उद्धृत केला आहेः

“आजपर्यंत सामान्य मानवाच्या सामाजिक व्यवहारांत स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव यांना स्थान नव्हतें व तें अद्यापहि प्राप्त झालेलें नाहीं. हीं ध्येयें केवळ आध्यात्मिक क्षेत्रांत कोंडलीं गेलेलीं होतीं. आतां तीं आध्यात्मिक क्षेत्रांत कोंडलेलीं ध्येयें मानवाच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहारांत प्रविष्ट होण्याचा प्रयत्न करीत आहेत. प्राचीन व मध्ययुगीन इतिहासांत ही गोष्ट अव्यवहार्य व अवास्तव गणली गेली होती. भौतिक विद्या आणि सामाजिक शास्त्रें यांच्यांतील प्रगतीमुळें आज सामाजिक जीवनांतील ही क्रांति व्यवहार्य बनलेली आहे. यामुळें प्रत्येक व्यक्तीला आत्मविकासाचें पूर्ण स्वातंत्र्य असावें, त्याचबरोबर समाजांतील सर्व व्यक्ती समान गणल्या जाव्या आणि त्यांच्यांतील बंधुभावना त्यांच्या सर्व व्यवहारांत प्रगट व्हावी याबद्दल आधुनिक कालांत क्रांतिकारक आंदोलनें सुरू झालेलीं आहेत. मानवसमाजांतील या क्रांतिकारक आंदोलनाच्या लाटा कोणत्याहि एका राष्ट्राच्या, किंवा सामाजिक संस्कृतीच्या बंधनांत सामावलेल्या नसून त्यांना विश्वव्यापक स्वरूप प्राप्त झालेलें आहे. युरोपांत निर्माण झालेली संस्कृति आज दुभंगलेली असून तिचें एक शकल अमेरिकेंत व दुसरें रशियांत जाऊन पडलेलें आहे. विसाव्या शतकाच्या प्रारंभीं आधुनिक युरोपीय संस्कृतीचीं अशीं शकलें झालेलीं नव्हतीं. तिचा संथ प्रवाह स्वतंत्रता, समता आणि बंधुता ह्या एकाच दिशेनें वाहत असून अखेरीस तो प्राचीन कालापासून मानवाच्या मनाला आकर्षण करणाऱ्या सत्ययुगाच्या अथवा परमेश्वरी साम्राज्याच्या सागराला जाऊन मिळेल अशी आशा यूरोपला व त्याच्या मागें राहिलेल्या इतर खंडांतील मानवांना वाटत असे. लोकशाही, बुद्धिस्वातंत्र्य, सामाजिक समता आणि व्यक्तिविकास ह्या सर्वांना अवसर देणारी संस्कृति यूरपांत निर्माण होऊन थोड्याच कालांत ती सर्व जगांत फैलावणार असा आशावाद पहिल्या जागतिक महायुद्धाच्या पूर्वी सर्वत्र फैलावूं लागला होता. पण आज हा आशावाद उरलेला नाहीं.

यूरोपीय संस्कृतीचीं शकलें झालेलीं आहेत. अमेरिकेंत व्यक्तिस्वातंत्र्याच्या नांवानें आर्थिक विषमता आणि द्विवर्ग समाजरचना यांचें संरक्षण करण्यानेंच ख्रिस्ती संस्कृति अथवा येशु ख्रिस्तानें मानवाला दिलेली जीवननिष्ठा चिरंतन होईल असा विश्वास दृढमूल बनूं लागला आहे. याच्या उलट ख्रिस्ताची जीवन-निष्ठा आधुनिक मानवानें झुगारून दिली पाहिजे आणि सामाजिक, आर्थिक समतेच्या प्रस्थापनेसाठीं कांहीं काल तरी व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही ह्यांचा लोप करून मानवसमाजांत एकपक्षीय अनियंत्रित राजसत्ता किंवा हुकूमशाही प्रस्थापित केली पाहिजे. हा विचार मानवाच्या शास्त्रीय बुद्धीचा अंतिम आदेश म्हणून रशियांतून सर्व जगभर फैलावण्यांत येत आहे. रशियांतील हा हुकुमशाहीचा विचार किंवा अमेरिकेंतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या नांवानें सामाजिक व आर्थिक विषमतेला चिरंतन करण्याचा विचार या दोहोंतूनहि मानवाला ज्या नव्या संस्कृतीची तहान लागलेली आहे तिची निर्मिति व प्राप्ति होणार नाहीं. या बद्दल विचारी मनुष्यानें आतां निःसंदेह बनलें पाहिजे. आधुनिक यूरोपांत निर्माण झालेल्या संस्कृतीचा केवळ अंधश्रद्धेनें वा आदरानें स्वीकार करण्यानें मानवाचें जीवन सुखी, समृद्ध आणि सुसंस्कृत होणार नाहीं. त्यासाठीं बुद्धिबलाहून श्रेष्ठ असें आत्मबल जागृत केलें पाहिजे.

" आधुनिक युरोपांत जेव्हां नवयुगाचा अवतार झाला तेव्हां तेथें मानवाचें आत्मबल व बुद्धिबल आणि त्याचें भौतिक बल या तिहींचीहि वाढ करण्याचा प्रयत्न झाला. पण त्यांतील आत्मबलाची वाढ खुंटत गेली. इंग्लंडांत प्युरिटन लोकांनीं जी क्रांति लोकशाहीच्या नांवानें केली, तिच्या बुडाशीं सामान्य जनतेचें आत्मबल जागृत करून तें राज-सत्तेच्या शस्त्रबलाविरुद्ध प्रभावी करण्याचा पहिला प्रयत्न झाला. पण येशू ख्रिस्ताच्या जीवनसंदेशाचा पुनरुद्धार करूं पाहणाऱ्या या प्युरिटन क्रांतिकारकांनीं आपणांस अभिप्रेत असणारें परमेश्वरी साम्राज्य भूतलावर स्थापन करण्यासाठीं शस्त्रबलाचा अति-रिक्त प्रयोग केला. याच्यांतून क्रॉम्वेलची हुकूमशाही निर्माण झाली आणि प्युरिटन पंथाला हवें असणारें परमेश्वरी साम्राज्य तर दूरच राहिलें; पण लोकशाही-सुद्धां नष्ट झाली. यानंतर अमेरिका व फ्रान्स ह्या देशांत लोकशाहीच्या नांवानें ज्या क्रान्त्या झाल्या त्यांतून निर्माण झालेली लोकशाही आज धनिक-शाहीच्या आहारीं जाऊन परमेश्वरी साम्राज्याच्या ऐवजीं धनिकांचें आसुरी साम्राज्यच लोकशाहीच्या नांवानें जगांत मिरवूं लागलें आहे. लोकशाहीला धनिकशाहीचा जडलेला रोग नष्ट करण्यासाठींच समाजवादाचा उदय झाला असून समाजवाद म्हणजे दुसरेंतिसरें कांहीं नसून आर्थिक क्षेत्रांतील लोक-शाहीच आहे, असें म्हणतां येतें. पण रशियांत ह्या आर्थिक लोकशाहीच्या संस्थापनेसाठीं राजकीय लोकशाहीचा अंत करण्यांत आलेला आहे. तेव्हां मानवसंस्कृतींत आपणांस जी क्रांति घडवून आणा-वयाची आहे तिची प्राप्ति रशियांतील समाजवादानें-सुद्धां होऊं शकेल हा पहिल्या महायुद्धानंतर कांहीं काल निर्माण झालेला आशावादहि आज विचार-वंतांना साधार वाटेनासा झाला आहे. पण समाज-वादावांचून मानवसंस्कृतीचा तरणोपाय नाहीं. अमेरिकनांची समाजवादविरोधी लोकशाही ही जगांत स्वतंत्रता, समता, बन्धुता, यांची स्थापना करूं शकत नाहीं, ह्याबद्दलहि संदेह उरलेला नाहीं. अशा अवस्थेंत जगाला महात्मा गांधींनीं एक नवी निष्ठा दिलेली आहे. ती निष्ठा म्हणजेच सत्याग्रह-निष्ठा होय. या निष्ठेंतून आधुनिक मानवाला आपल्या मानव्याचा आदर्श प्राप्त होऊं शकेल आणि त्याच निष्ठेच्या आधारावर मानवसमाजांत जी सर्वांगीण क्रांति आज अपरिहार्य झालेली आहे ती करण्याचाहि प्रभावी मार्ग सापडूं शकेल असें माझें मत आहे.

" ही सत्याग्रहनिष्ठा आणि आधुनिक युगांत निर्माण झालेली मानवता यांबद्दल दोन शब्द येथें लिहिणें अवश्य आहे. बुद्ध-ख्रिस्तादि प्राचीन धर्म-संस्थापकांच्या जीवनांत प्रकट झालेली सत्यनिष्ठा व अहिंसावृत्ति ह्यांतच महात्मा गांधींनीं दिलेल्या सत्याग्रही निष्ठेचा उगम असला तरी त्या सत्याग्रह-निष्ठेनें सामाजिक, आर्थिक व राजकीय क्षेत्रांत आज अपरिहार्य असलेली सर्वांगीण क्रांति करण्याचें ध्येय अंगीकारिलेलें आहे. या दृष्टीनें विचार केल्यास सत्याग्रही निष्ठेनें मानवाच्या नीतिशास्त्रांत व अध्यात्म-शास्त्रांत नवी भर घातलेली आहे असें मान्य करावें

लागेल. महात्मा गांधींनीं बुद्ध आणि ख्रिस्त यांनीं मानवाला दिलेल्या जीवननिष्ठेंत महत्त्वाची भर घालून सामान्य जनतेच्या आत्मबलाचा प्रभाव सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांत कसा पाडतां येतो ह्याचा एक प्रयोग दोन जागतिक महायुद्धांच्या मध्यंतरीच्या कालांत करून दाखविला. सांस्कृतिक क्रांतिकार्याला युरोपांत निर्माण झालेला केवळ बुद्धिनिष्ठ मानवतावाद पुरेसा पडणार नाहीं हें ओळखून आत्मबलाच्या अधिष्ठानावर त्यांनीं सत्याग्रहनिष्ठा निर्माण केली व ती मानवाला अर्पण केली. बुद्धिनिष्ठ मानवता-वाद हा क्रांतिकार्याला अपुरा पडतो असें पाहिल्यानंतर आधुनिक युरोपांत मानवतेच्या उपासकांनीं शस्त्रबलाची आराधना केली. पण या आराधनेमुळें बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही या मानवी जीवनमूल्यांचा अंत होत आहे. याच पेंचांतून पुढें जाण्याचा मार्ग सत्याग्रहाची निष्ठा निर्माण करून महात्मा गांधींनीं आधुनिक मानवाला दिलेली आहे. यामुळें त्याची बुद्धिनिष्ठा मंद न बनतां प्रखर बनेल. त्याचें व्यक्तिस्वातंत्र्य स्वार्थ आणि अहंकार यांच्या आहारीं जाऊन समाजांत विषमता निर्माण न करतां निरहंकारी व निर्भय वृत्तीनें अखिल मानवाच्या सेवेंत समाधान मानूं लागेल. त्याची लोकशाही धनिकशाहीच्या आहारीं न जातां धनिकशाहीचें उन्मूलन करील आणि त्याचा समाजवाद हुकुमशाहीच्या खोड्यांत जनतेचे पाय न अडकवितां, सर्वोदयाचें शिखर गांठण्याचा स्वावलंबी मार्ग समाजांतील प्रत्येक दलित व्यक्तीला दाखवून देईल. त्यांतून मानवतेचा भावी विकास होणार असून ज्या सामाजिक सर्वांगीण क्रांतीचा प्रारंभ आधुनिक युरपांत इ० सनाच्या १७ व्या शतकांत झाला तिची पूर्तता करण्याचें श्रेय आधुनिक भारताला मिळूं शकेल असा विश्वास मला वाटतो. ”

### धरणीकंप

ता. १४ ऑगस्ट आणि १५ ऑगस्टला आसाम प्रांतांत जोराचे धरणीकंपाचे धक्के बसले आणि त्यांनीं आसामच्या उत्तर विभागांत भयंकर हाहाकार उडवून दिला. एकंदर नुकसान फार झालें आहे. यापूर्वी १९३४ सालीं बिहारमध्यें धरणीकंपाचे धक्के बसले होते. त्यांनींहि अशी हानि केली होती. हे धरणीकंप कसे होतात व त्यांचें क्षेत्र किंवा पट्टे कोणते आहेत याविषयींची माहिती “ इलस्ट्रेटेड वीक्ली ”च्या १ ऑक्टोबरच्या अंकांतील श्री. बी. एस्. एन्. भूषण यांच्या लेखावरून संकलित करून खालीं दिली आहे :

“ पृथ्वीच्या पोटांत बाह्य पृष्ठाच्या आंतील बाजूस लवचिक खडक असतात व त्यांवर एखाद्या जागीं भूगर्भांतील रसायन येऊन आदळतें. त्यामुळें जी हालचाल उत्पन्न होते तो खरा धरणीकंप. या आंतील कंपामुळें त्या लवचिक खडकांत कोठें तरी चीर जाते. या चिरेंतून घर्षण निर्माण होतें व त्यांतून स्थितिस्थापक लहरी उत्पन्न होतात. त्या भूपृष्ठभागापर्यंत येऊन तेथील जमीन व वरचे खडक यांना हादरा देतात. तोच आपणाला जाणवणारा बाह्य धरणीकंप होय.

“ या लहरींच्या स्वरूपावरून ही हालचाल किती खोलीवर चालू झाली तें आपणाला समजूं शकतें. ती २० ते ३० मैल खोलीवर असते. सीस्मॉलॉजिस्ट—धरणीकंपाचे तज्ज्ञ—आपणाला सांगतात कीं, पृष्ठभागाखालीं ४५० मैलांइतक्या खोलीवरहि ते कंप उत्पन्न होऊं शकतात. यांना ‘ खोल केन्द्र असलेले ( deep-focussed ) ’ भूकंप म्हणतात.

“ हे खोल केंद्र असलेले भूकंप पृथ्वीच्या चार प्रदेशांत होतात : जपानचा पूर्व किनारा, दक्षिण अमेरिका, हिमालयाची पर्वतराजि आणि फोर्मोसाकडील ईस्ट इन्डीजची बाजू. सर्व धरणीकंपांतील सुमारें दहा टक्के भूकंप असे ‘ खोल-केंद्रित ’ असतात. त्यांचा शंकूसारखा वर निमुळता आकार असतो व इतर धरणीकंपांतील ‘ नंतरचे आघात ’ यांच्यांत नसतात.

“ धरणीकंपाच्या तीन प्रकारच्या लहरी सीस्मोग्राफ-यंत्रावर अंकित होतात. मुख्य (primary) लहरी आडव्या जातात, दुय्यम ( secondary ) लहरी किंवा ‘ कंप-लहरी ’ ( shake-waves ) उभ्या जातात. पहिल्या धक्क्यानंतर लगेच व नंतर अंतरा-अंतरानें—तासांनीं, आठवड्यांनीं किंवा महिन्यांनीं जे धक्के बसतात त्यांना “ नंतरचे धक्के ” (after-shocks ) किंवा सहानुभूतिपर धक्के

म्हणतात. सोप्या शब्दांत सांगावयाचें तर प्रथम आकस्मिक कंपन सुरू होतें, नंतर प्राथमिक लहरी सुरू होतात, मग दुय्यम लहरी कांहीं क्षण चालतात. सर्वांत शेवटीं 'लॉंजिट्यूडिनल' लहरी कंप पावतात. व त्या कांहीं सेकंदापासून कांहीं मिनिटांपर्यंत टिकतात. धरणीकंपाबाबतची चमत्कारिक गोष्ट ही आहे कीं, तो अगदीं थोडाच वेळ टिकतो, आणि असें असूनहि त्यामुळें किती विविध आणि भयंकर नाश होतो! धरणीकंप दोन ते पांच मिनिटें टिकणें ही गोष्ट विरळाच होय.

"भूपृष्ठावर आपणाला समजणाऱ्या धरणीकंपाप्रमाणेंच समुद्रसपाटी-खालीं (submarine) होणारे भूकंपहि आहेत. अशा सर्व धरणीकंपांतील बहुसंख्य कंप प्रशांत-(पॅसिफिक)-महासागराच्या प्रदेशांत होतात. समुद्रांतर्गत धरणीकंपाचा सहज दिसणारा विशेष म्हणजे पर्वतप्राय "भरतीची लाट" होय. जपानी भाषेंत या लाटेला 'त्सुमानी' (tsumani) म्हणतात. सन १७०३ मध्यें एकाच 'त्सुमानी'नें जपानचे एक लाख लोक गिळून टाकले होते!

"या धरणीकंपांची 'घनता' (density) त्यामुळें होणाऱ्या हानीवरून व निर्दिष्ट झालेल्या परिणामांवरून ठरविली जाते. १ ते ४ पर्यंतच्या पातळीचे घनतेचे धक्के आपणाला जाणवत नाहींत; ४ च्या वरील धक्के हानिकारक होतात, कारण त्यांनीं सामानसुमान गदगदां हालवलें जातें; ७ व्या पातळीवरील धक्क्यांनीं उंच-उंच धुराडीं कोसळतात; १० ची घनता ही सर्वोच्च होय आणि त्यामुळें इमारती एकदम कोसळून पडतात.

"धरणीकंपाचा वेग या घनतेवर आणि लहरींच्या माध्यमावर अवलंबून असतो. कॉनरॅड नामक भूकंपशास्त्रज्ञाच्या मतें पृथ्वीच्या वरच्या पापुद्र्यांत हा वेग सेकंदाला साडेतीन मैल असतो. भूकंपाचा आगाऊ कयास बांधणें कठिण आहे पण सॅनफ्रान्सिस्कोच्या धरणीकंपाचें भाकित वीस वर्षें अगोदर वर्तविलेलें होतें असें म्हणतात." (आसामधील धरणीकंपाबाबतहि जपानमधील तज्ज्ञांनीं असेंच भाकीत केल्याच्या वार्ता वर्तमानपत्रांत आल्या होत्या. पण त्यांतील अधिकृत किती तें कळत नाहीं.)

"धरणीकंपांपैकीं बहुतेक भूगर्भांतील रचनेबाबतच्या विक्रियांचे असतात. (५ टक्के कंप मात्र ज्वालामुखीच्या संबंधानें उत्पन्न होतात; पण ते एवढे हानिकारक नसतात.) पृथ्वीच्या पोटांत खडकांच्या गुंडाळ्या होतात किंवा त्यांना तडे जातात (the folding and fracturing of rocks). अशा तऱ्हेनें तिच्या रचनेंत फरक होतात व त्यामुळें हे कंप उद्भवतात. अशा चिरा किंवा तडे जाण्यामुळें होणारे धरणीकंपच भयंकर नाशकारक असतात. लिस्बनचा भयानक धरणीकंप (१७५५), टोकियोचा (१९२३) आणि आसामचा (१८९७) हे तीन भूकंप याचीं मोठीं उदाहरणें आहेत.

"धरणीकंपाचे भूगोलावरील पट्टे दोन आहेत. सापेक्षतः 'अलीकडच्या' किंवा कमी प्राचीन पर्वतराजींच्या प्रदेशांतील पृथ्वीच्या कमकुवत भागाशीं ते पट्टे निगडित आहेत. एक पट्टा उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील पश्चिम किनाऱ्यांच्या बाजूनें आणि आशियाच्या पूर्वेकडील जपान, फिलिपाइन्स् वगैरे द्वीपसमूहांच्या बाजूनें जातो. याला पॅसिफिक पट्टा (Pacific Belt) म्हणतात. दुसरा पट्टा भूमध्य समुद्र, आल्प्स् पर्वत, कॉकेशस पर्वत आणि हिमालय यांच्या खालून पूर्वेकडे ईस्ट इन्डीजमध्यें जातो व पहिल्या पट्ट्याला छेदतो.

"हिंदुस्तानांतील या पट्ट्याचे तीन प्रदेश आहेत. एक हिमालयाचा प्रदेश, दुसरा सिंधु-गंगांच्या मैदानाचा प्रदेश. तिसरा उपपट्टा हिंदुस्तानचा दक्षिण-द्वीपकल्पीय भाग; पण येथें भूकंप फार हानिकारक नसतात. याचे चार प्रादेशिक विभागहि पाडतां येतात. कच्छ, बलुचिस्तान (आतां पाकिस्तानांत), उत्तर हिंद, आणि आसाम व ब्रह्मदेशाच्या लगतचा भाग. कच्छमधील भयंकर भूकंप १८१९ मध्यें घडला. तीस हजार वस्तीचें एक खेडें जमिनींत गाडलें गेलें. ९० मैलांच्या विस्तारांत जमीन ३० फूट वर आली होती. बलुचिस्तानांतील धरणीकंप म्हणजे १९३५ चा क्वेट्टा येथील. उत्तर-हिंदमधील भूकंपांत बिहारचा महान् भूकंप (१९३४) आणि कांग्राचा पंजाबमधील भूकंप (१९०५) हे भयानक होते. आसामांतील सर्वांत भयंकर धरणीकंप १८९७

मध्यें झाला. चेद्रांग येथील जमिनीची ' भेग ' (fault ) हा त्याचाच परिणाम होय. तीन मैलाच्या क्षेत्रांत ३९ फूट (जास्तींत जास्त) जमीन उंचसखल झाली; ब्रह्मपुत्रेचा मार्ग बदलला; अनेक ओढे नाहींसे झाले; शिलांगमध्यें भयंकर हानि झाली. १८६९ व १९३० मध्येंहि तेथें धरणीकंप झाले. नुकत्या झालेल्या धरणीकंपांतील घडामोडींची पुरी माहिती अजून मिळालेली नाहीं."

## कम्यूनिझमधील मूलभूत दोष

जगप्रसिद्ध इंग्रज लेखक आणि तत्त्वज्ञ मि.बर्ट्रान्ड रसेल यांनीं नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या " दि गॉड् दॅट् फेल्ड " या मोठ्या विचारक्षोभक सोव्हियेत-विरोधी पुस्तकाच्या प्रकाशनाच्या निमित्तानें कम्यूनिझममधील मूलभूत दोषांबद्दलचीं आपलीं मतें पुन्हां एकदां लोकांपुढें मांडलीं. तीं ' वर्ल्ड रिव्ह्यू ' वरून ' मिरर ' मासिकाच्या नं. २६ च्या अंकांत दिलेलीं आहेत. मि. बर्ट्रान्ड रसेल यांचीं मतें विचारणीय असल्यामुळें थोडक्यांत पुढें देत आहोंत. मि. रसेल म्हणतात :

" वर उल्लेखिलेल्या पुस्तकाचे सहा लेखक स्वतःची कम्यूनिझमपासून कां फारकत झाली याबद्दल जीं कारणें देतात तीं पाहणें मजेशीर वाटेल. कोअेस्ट्लरला स्पॅनिश तुरुंगांत असतांना व्यक्तीच्या महत्त्वाचें तत्त्व पुरें पटलें, सायलोन याला जेव्हां पार्टीच्या लोकांकडून ट्रॉट्स्कीच्या कांहीं एका लिखाणाचा निषेध करण्यासाठीं तें न दाखवितांच शिस्त म्हणून सही करण्यास सांगण्यांत आलें तेव्हां त्याला धक्का बसला. रिचर्ड राइटला लेखक म्हणून काम करण्याची इच्छा होती. पण त्याला आपल्या अमेरिकन् ' भाई 'मध्यें बुद्धिवादी लोकांबद्दलच्या गाढ संशयाचें वातावरण आढळलें व त्यामुळें पुढें त्या लोकांनीं त्याच्यावर विश्वासघातकी (traitor) म्हणून शिक्का मारला. आन्द्रे जिद् ( फ्रेंच नोबेल-पारितोषिक-विजेता ) याला स्टालिनच्या विभूतिपूजेमुळें किळस आली आणि बौद्धिक किंवा कलात्मक स्वातंत्र्याचा अभाव पाहून नकोसें झालें. लुई फिशरनें बरेच दिवस कां कूं करून शेवटीं हिट्लर-स्टॅलिन कराराच्या वेळीं पार्टीशीं असलेला आपला संबंध तोडला. स्पेन्डरला, स्पॅनिश राजनिष्ठ लोकांच्या कांहीं सेनाविभागांना नामोहरम करण्यासाठीं कम्यूनिस्टांनीं अवलंबलेल्या मार्गांची किळस आली; आणि आर्थर कोअेस्ट्लरचें पार्टीच्या सनातनीपणाविरुद्ध बंडहि यामुळेंच मुख्यतः घडलें...

" पण या विकृत दशेचें हें केवळ बाह्य निदान आहे. तिची खरी चिकित्सा करावयाची तर आपणांला दोन मूलभूत उणीवांकडे लक्ष दिलें पाहिजे. ते दोष म्हणजे पार्टीतील जड प्रामाण्यवाद ( dogmatism ) आणि करुणेच्या भावनेचा संपूर्ण अभाव हा होय. हे दोन्ही दोष लेनिनमध्येंहि होतेच...भूतकाळांत ज्या हुकूमशाह्या झाल्या, त्यांतहि हे दोष होते व तेच येथेंहि आहेत. या मौलिक ऐतिहासिक, मानसशास्त्रीय, आणि तात्त्विक प्रमादांतूनच कम्युनिझममध्यें जें जें जुगुप्साकारक आहे तें तें सर्व निर्माण झालें आहे.

" सन १९१८ मध्यें बोल्शेव्हिकविरोधी लोकांचें बहुमत होतें. त्या वेळीं अल्पमतवाल्या बोल्शेव्हिकांनीं असेंब्ली बरखास्तच केली...जेव्हां अल्पमतवाले बळजबरीनें सत्ता गाजवतात तेव्हां त्यांना पोलिसांच्या सामर्थ्यावर अवलंबून राहवें लागतें. गुप्त कटांच्या भयानें पोलिसांचा जाच सुरू होतो आणि पोलिसांच्या जुलमामुळें असमाधान निर्माण होऊन त्यांतूनच कटांची भीति जास्त वाढते. या दुश्चक्रा-( vicious spiral )-मुळें अशा सत्ताधाऱ्यांचें कोंडाळें संकुचित होऊं लागतें. ज्याच्या हातीं पोलिस त्यांचा आपली सत्ता वाढविण्याकडे कल असतो. कांहीं काळानें सत्ता कायम ठेवण्यासाठीं पोलिसवर्ग बनावट ' कट ' करूं लागतात; किंवा आपल्या हस्तकां-( agents provocateurs )-कडून तसे कट करवूं लागतात. अखेरीस प्रत्येकजण इतरांबद्दल संशयी बनतो.

" सुरुवातीला कम्युनिस्टांनीं सत्ता हातीं ठेवली तरी ' आर्थिक 'समता स्थापण्याचा प्रयत्न केला. पण पुढें खऱ्या कम्युनिस्टांमध्येंच ' स्वार्थवादी लोक ' ( careerist ) शिरले आणि मग आर्थिक असमता जाणूनबुजून परत आणली गेली. हातीं येणाऱ्या माहितीवरून असें दिसतें कीं, इतर कोठल्याहि देशाच्या मानानें ती असमानता रशियांत जास्तच आहे; ट्रेड युनिअन्स हें सरकारच्या










खिशांतलें एक खातें आहे; असंतुष्ट कामगारांना सहजीं 'सक्तीच्या मजूरकेंद्रा'वर पाठवतां येतें किंवा त्यांचें रेशनकार्ड जप्त करतां येतें; तेथील खरा श्रमजीवी मनुष्य इंग्लंडांतील औद्योगिक क्रांतीच्या वेळच्या अत्यंत खराब काळापेक्षांहि आज अधिक सत्ताहीन आहे.

"एकोणिसाव्या शतकांतील इंग्लंडांतल्याप्रमाणेंच आजच्या रशियांतील 'सक्तीच्या मजुरी'ची पद्धत म्हणजेच भूतदयेचा उलटा चाललेला प्रकार आहे. मूळची कल्पना गुन्हेगार मजुरांना सुधारण्याची. पण पहिल्या महायुद्धानंतर पुढें हे लेबर-कॅम्पस् आर्थिक दृष्टीनें फायदेशीर पडूं लागले; यांत्रिक साह्य नसलें तरी चालतें, वाईट वातावरण असलें तरी चालतें, विचारणार कोण ! अशा प्रकारें गुन्हेगार उपयोगी ठरूं लागले. तेव्हां त्यांचा पुरवठा कायम ठेवलाच पाहिजे यासाठीं कायदे फिरविले, शिस्तभंग किंवा पक्षशुद्धि केली, हद्दपारी सुरू केली. यांत मुख्यतः पोलंडचे रहिवासी पोल्स व इतर जिंकलेले परदेशी लोक असत. कांहीं अधिकारी तज्ज्ञांनीं अंदाज केल्याप्रमाणें सोव्हिएट-संघांच्या प्रदेशांत राहणाऱ्या प्रौढ जनतेपैकीं १६ टक्के लोक 'सक्तीच्या मजूरकॅम्पां'त रवाना होतात. बहुधा हा अंदाज प्रमाणाबाहेर असावा; पण असे मजूर अनेक दशलक्ष आहेत हें नक्कीच; आणि त्यांची परिस्थिति कल्पना करवणार नाहीं इतकी खराब आहे, याबद्दलहि मुळींच शंका नाहीं.

"भयंकर गुप्तपणा हा एक मोठा दोष तेथें आहे व तदनुषंगानें इतर दोष राहतात. इतर देश आंकडेवारी प्रसिद्ध करतात. आपल्या पुढच्या प्रचारासाठीं जेवढी माहिती प्रसिद्ध होणें आवश्यक त्याहून अधिक रशिया प्रसिद्ध होऊं देत नाहीं. इतर देशांत परकीयांना, कांहीं लष्करी ठाणीं वगळून, सर्वत्र जाऊं देतात. रशियांत जाऊं देत नाहींत. इतर देशांतील सरकारें आपल्या नागरिकांना परदेशांत प्रवासाला जाऊं देतात: रशियन सरकार तसें जाऊं देत नाहीं. कारण तुलनेमुळें अप्रिय परिणाम त्यांच्या मनावर घडेल अशी भीति त्याला वाटतें. ईशान्य सैबेरियांत–फ्रान्स-जर्मनीच्या संयुक्त क्षेत्रफळाएवढ्या विस्तीर्ण प्रदेशांत–फक्त अंमलदार व गुन्हेगार राहतात व तेथें जगांतील सर्वांत मोठी सोन्याची खाण सांपडली आहे असें म्हणतात. त्यांतून किती सोनें निघतें ही माहिती सरकारवांचून इतर कोणालाहि लागूं देत नाहींत. इंग्लंडच्या रॉयल सोसायटीच्या अध्यक्षांना रशियन शास्त्रज्ञ व्हाव्हिलोव याला असें कळवावयाचें होतें कीं व्हाव्हिलोव यांस रॉयल सोसायटीनें सन्मान्य सभासद निवडलें आहे, पण व्हाव्हिलोव कोठें आहे याचा पत्ताच लागूं शकला नाहीं किंवा तो जिवंत आहे कीं नाहीं हेंहि कळलें नाहीं. या पडद्याआड काय चालतें ? एखाद्या आदर्शलोकाची—युटोपियाची—रचना चालली असेल, असें मला वाटत नाहीं. झारच्या काळांतहि 'रशियांत सुखी नि स्वतंत्र कोण असेल ?' या नांवाचें एक प्रसिद्ध पुस्तक होतें, पण स्टालिनच्या रशियांत असें पुस्तक प्रसिद्ध करणें शक्यच नाहीं."

## रशियन प्रजेला युद्धाबद्दल काय वाटतें ?

आतां कोरियाचें युद्ध समाप्त होण्याच्या मार्गावर आहे. अनेक अभ्यासकांनीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें, या आक्रमणांत रशियाचा हात होता असें कोणालाहि दाखवितां आलेलें नाहीं. अमेरिकेनें मात्र अत्यंत घाई-घाईनें यूनोच्या सुरक्षासमितींत ठराव करून आपलीं सैन्यें रणक्षेत्रावर आणलीं. मॅक्-ऑर्थरच्या फोर्मोसा-विषयक लष्करी ललकाऱ्यांना तर अध्यक्ष ट्रुमन यांनींच लगाम घातला. तरीहि 'रशियाच्या 'साम्राज्यशाही'बद्दल हवें तें बोललें जातें; छापलें जातें. १७५ सोव्हिएत लष्करी तुकड्या पश्चिम युरोपवर चाल करून येत आहेत अशीं स्वप्नें रंगविलीं जातात. रशियन दृष्टिकोनाचें अभ्यासपूर्ण पृथक्करण कोणीहि करीत नाहीं' असे उद्गार 'न्यू स्टेट्स्मन अ‍ॅन्ड नेशन' या प्रसिद्ध इंग्रजी साप्ताहिकांत (२ सप्टें.) अलेक्झांडर वर्थ यांनीं काढले आहेत; आणि त्यांनीं रशियन लोकांची एकंदर युद्धविषयक काय वृत्ति आहे हेंहि पुढें दिग्दर्शित केलें आहे :

"कांहीं गोष्टींबद्दल रशियन लोकांत निर्विवाद एकमत व संघशक्ति आहे. शांततेच्या इच्छेबाबत एकात्मता आहे. अमेरिकेच्या द्वेषाबाबत एकमत आहे. चीन व कोरिया यांबद्दल आत्यंतिक बंधुभाव

आहे. अमेरिकेबद्दल तिटकारा म्हणजे अमेरिकेच्या सत्ताधाऱ्यांबद्दल तिटकारा; सामान्य जनतेद्दल नव्हे.

"गेल्या महायुद्धांत रशियाला अभूतपूर्व यातना सहन कराव्या लागल्या आहेत आणि त्याची स्मृति अजून ताजी आहे. कांहीं झालें तरी युद्ध रशिया-पर्यंत येऊं न देण्याची सोव्हियेत सरकार शिकस्त करील. रशियांतील प्रत्येक माणूस पढविल्याप्रमाणें वागतो असें म्हटल्यानें प्रश्न मिटत नाहीं. साडेअकरा कोटी प्रौढ प्रजेनें 'स्टॉकहोमच्या विनंतिपत्रका' वर सह्या केल्या; त्या या भावनेनें कीं, आपण यामुळें आपल्या देशाचें व आपल्या मुलांभावांचें कल्याणच साधीत आहोंत. हजारों मजुरांनीं, शेतकऱ्यांनीं व इतर सामान्य प्रजेनें लिहिलेलीं व वृत्तपत्रांत आलेलीं हीं सर्वच पत्रें बनावट आहेत असें म्हणावयाला जागा नाहीं.

"वर्तमानपत्राप्रमाणेंच अन्य क्षेत्रांतहि ही 'शांततेची चळवळ' चालू आहे. कारखान्यांतून जादा काम यासाठीं चालतें. रंगभूमि व चित्रपट यांचीहि शांतता-मोहीम चालू आहे. लेखक आणि गीतरचनाकार अंधारपटलाआडून पुन्हां या शांतता-मोहिमेसाठीं आपल्या प्रतिभेला बाहेर काढूं लागले आहेत. ॲना आख्मेटोवा हिनें नुकताच एक कवितासंग्रह प्रसिद्ध केला आहे व त्यांतील मुख्य भावनात्मक सूत्र 'रशियन् भूवर नांदो शांति' असें आहे. प्रोकोफीव्हनें एक 'पीस् ऑरेटोरिओ' मुलांच्या समूहखेळासाठीं लिहिला आहे. त्यांत रशियन प्रजेच्या भविष्यकालीन सुखी जीवनाचें चित्र आहे आणि 'वॉल स्ट्रीट शार्क्स' विरुद्ध खोंचक व्याजोक्ति आहे.

"आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवणें बरें. रशियांतील जीवनमानानुसार तो देश सध्यां भरभराटत आहे. गेल्या पांच वर्षांत पुनर्रचनेचें खूप काम झालें आहे. पूर्वीं कधीं नव्हतें एवढें अन्नधान्य उपलब्ध झालें आहे; मोठमोठ्या शहरांत राहण्याची व्यवस्था अजून वाईट असली तरी नित्योपयोगी वस्तूंचा तुटवडा नाहीं. शेतकीचें उत्पन्न खूप वाढलें असून या वर्षीचें पीक फारच चांगलें आहे. थोडक्यांत म्हणजे, थोड्याच काळांत चांगली स्थिति येईल असें सरकारनें दिलेलें वचन खरें ठरत आहे; आणि वनसंवर्धनाची जी अवाढव्य योजना आंखली आहे तिनें तर तरुण मनांना वेड लावलें आहे. क्यूईबायशेव्हचा जल-विद्युत् कारखाना 'जगांतील सर्वांत मोठें' प्लॅन्ट होणार आहे. 'प्रवदा' २३ ऑगस्टच्या अंकांत म्हणतें, 'जगांतील भांडवलदारवर्ग युद्धाच्या विकृत भावने-( war psychosis ) नें झपाटले गेले असतां आम्ही सोव्हियेतचे लोक ही निर्मिति करीत आहोंत.'

"इकडे मॉस्कोंत 'उच्च बांधकाम' म्हणजे गगनचुंबी इमारती बांधल्या जात आहेत. याचा अर्थच असा कीं, मॉस्कोवर ॲटम बॉम्ब पडावयाची अपेक्षा स्टालिनला नाहीं. पण याचा अर्थ मॅक्आर्थरसारखे अमेरिकन ( आणि चर्चिलसारखे ब्रिटिश ) मॉस्कोवर बॉंब टाकणार नाहींत असा नव्हे, तर पश्चिम यूरोपांतील शंभर टक्के लोकमत ॲटम बॉम्बच्याविरुद्ध आहे, हा होय. क्वचित् रशियन ॲटम बॉम्बचा उल्लेख रशियन वृत्तपत्रांत येतो पण तो एवढ्यासाठींच कीं यामुळें अमेरिकेच्या ॲटम-विषयक घाणेरड्या प्रचाराला मूठमाती मिळावी म्हणून. बाकीच्या बाबतींत सोव्हियेत सुधारणेची वाखाणणी तिच्या 'मानवताप्रेमा'बद्दल केली जाते, कारण रशियन संस्कृतीनें अमेरिकेप्रमाणें 'मानवी डी. डी. टी.'चा सर्रास उपयोग करावयाचें तत्त्व कधींच मान्य केलेलें नाहीं.

"कोरियाच्या प्रकरणामुळें रशियन लोकांना एक तऱ्हेची भीति वाटूं लागल्यासारखें दिसतें, आणि एकंदरींत असें वाटतें कीं, यापुढें रशियाचें धोरण जरासें बदलेल. अमेरिकेनांना जें आक्रमणासारखें वाटेल तें सर्व कांहीं टाळण्याकडे त्यांचें सर्व लक्ष राहील. त्यांची खात्री झालेली आहे कीं, अमेरिकेंत युद्ध हवें असणारा महत्त्वाचा व वजनदार वर्ग आहे, व जेवढें तें लौकर होईल तेवढें त्यांना बरेंच वाटेल!"

## पहाडी मुलखांतील बहुपतित्वाची चाल

महाभारतांत द्रौपदीनें पांच पती केल्याची कथा आहे. पण अन्यत्र असे उल्लेख जवळ जवळ नाहींतच. परंतु ज्या प्रदेशांतील ही पांचालकन्या होती त्याच प्रदेशाच्या जवळ हिमालयाच्या कुशींत जो आजचा हिमाचल प्रदेश आहे तेथें ही प्रथा आजहि चालू आहे. एका कुटुंबांतील भावांत घर, मिळकत, पशू, शेती वगैरे जसें समाईक तशीच स्त्रीहि समाईक असते. एकाहून अधिक स्त्रिया असल्या तरीहि त्या








सर्वांच्याच समजल्या जातात. या प्रथेबाबत एक प्रत्यक्ष माहितीचा लेख "संस्कृति" मासिकाच्या सप्टेंबरच्या अंकांत स्वामी आनंद यांनीं लिहिला आहे. स्वामीजी तिकडच्या पहाडी मुलखांतच कौसानी मुक्कामीं सध्यां आहेत. गांधीजींच्या अहमदाबाद-मधील वास्तव्यांत व नंतरहि ते एक मोठे कार्यकर्ते होते. सध्यां ते राजकारणी जगापासून अलिप्त राहतात. स्वामीजी आपल्या लेखांत लिहितात :

"...पांडवांचे वंशज आपण आहोंत असें या बाजूचे सर्वच लोक सांगतात. 'साटी' लोक कौरवांचे व 'पासी' लोक पांडवांचे वंशज म्हटले जातात. या लोकांत अजूनहि सणावाराला धनुष्यबाणाच्या दंगली होतात व खेळाडू 'मी पांच बापाचा मुलगा आहे, मी सात बापांचा बेटा आहे, कोणाकडून हैराण नाहीं होणार, तुझी काय बिशाद ?' असें आपल्या प्रतिस्पर्ध्याला सांगण्यांत गर्व मानतात. आपण स्वतः महाभारती संस्कृतीचे सीधे वारस आहोंत, पांच पतींची बायको द्रौपदी आपल्या जातीची कुळदेवता आहे, वाटेल तेवढ्या पतींबरोबर लग्न करावें, आमच्या पोरींना तिचें वरदान आहे, असें हे लोक अभिमानपूर्वक सांगतात.

"बहुपतित्व ब्राह्मण-ठाकूरांपासून आदिवासीं-पर्यंत सर्व वर्णांत सर्वसामान्य आहे. त्या चालीचा खुलासा म्हणून असें सांगतात कीं, पहाडी मुलुखांत जमिनी लहान व शेती फार कष्टानें होते. त्यांत जर भाऊभाऊ वेगळे झाले तर जमीन कोठूनआणणार नि जगणार कशावर ? या प्रथेचें आर्थिक महत्त्व काय असेल तें असो पण त्यामुळें स्त्रीची स्थिति अत्यंत वाईट झाली आहे यांत शंका नाहीं. सर्वांची एक स्त्री याचा अर्थ असा कीं स्त्रीला व्यक्तित्व किंवा स्वतंत्र अस्तित्व असें नाहींच. मिळकतींत तिला कांहीं हक्क नाहीं. पोरेंहि बापाचींच. शिवाय प्रमेह, उपदंश वगैरे रोगहि या लोकांत फार बोकाळलेले असतात....

"या बहुपतित्वाच्या प्रथेचें स्पष्टीकरण एकदां काशीच्या एका वयोवृद्ध संन्याश्याच्या तोंडून असें ऐकलें... तो म्हणाला; 'ही सर्व भोगभूमि आहे. तपोभूमि नव्हे. ही गोपींची भोगभूमि आहे. गोपी कृष्णाला पतिभावानें भजत असत. कामातुर असत. पण भगवान् त्यांची वासनातृप्ति करायला व्रजभूमींत राहिले नाहींत. द्वारकेला निघून गेले आणि त्यांनीं तेथें आठ पट्टराण्या आणल्या. विरहानें व्याकुळ झालेल्या गोपी व्रजभूमींतच राहिल्या. त्यांनीं कृष्णाची आराधना केली. भगवंतानें त्यांच्या प्रेम-भक्तीनें प्रसन्न होऊन त्यांना वर दिला कीं, 'जा, तुमचा पुनर्जन्म पहाडी मुलुखांत होईल. उघड-पणें ५–१० पती करा, कोणताहि दोष लागणार नाहीं.' म्हणून हे पहाड भोगभूमि बनले आहेत. बस भोगहिभोग प्रधान. जपतप कुछ नहिं. भगवान के वर से निरी कामभूमि हुई. यहां तक की स्वयं पांडवोंने भी इसकी परतीत पाई थी.'

"असें म्हणून त्यांनीं पुढची विचित्र कथा सांगितली : 'पांच पांडव कुंतीमातेबरोबर हिमा-लयाच्या पहाडांत फिरत फिरत येथें आले. एका गांवाच्या शिवेला चांगलेसें ठिकाण पाहून रात्रीचा मुक्काम केला. अर्ध्या रात्रीं कुंतीला कामबाधा झाली. पुत्राला उठवून म्हणाली: 'मला पुरुष आणून दे' युधिष्ठिर चकित झाला. 'माते, हें काय बोलतेस ? तुला झालें तरी काय ?' 'बस' बाकी कांहीं बोलूं नको.' धर्मराजानें चारी भावांना उठविलें. तो म्हणाला, 'ही भूमि भयानक आहे. येथें क्षणभरहि राहणें बरें नव्हे. आतांच्या आतां निघा.' रातोरात चालूं लागले आणि यमुनेच्या पार जाऊन उत्तरखंडा-च्या भूमीवर आले. कुंतीमाता यमुनेच्या पलीकडे आल्याबरोबर अगदीं शांत, नेहमींसारखी तपस्विनी योगमाया बनली होती; पण धर्मराजानें पुन्हां पड-ताळा पाहण्यासाठीं त्या गांवाहून बांधून आणलेली दहा शेर माती पसरून त्यावर मातेचें अंथरूण घातलें. अंथरुणावर पाय ठेवतांच माता पुन्हां तशीच कामातुर झाली आणि मागील रात्रीप्रमाणेंच पुन्हां ती निर्लज्ज मागणी करूं लागली ! धर्म-राजाची खात्री झाली आणि त्यानें घाईघाईनें तिला उचलून अंथरुणाबाहेर बसविली त्याबरोबर ती शान्त झाली. असा ह्या कामभूमीचा प्रताप आहे !'"

---

# चवथ्या वर्षांत पदार्पण केल्यावर

‘ नवभारता ’ला सप्टेंबर १९५० अखेर तीन वर्षें पूर्ण होऊन त्यानें ऑक्टोबरच्या अंकासमवेत ४ थ्या वर्षांत पदार्पण केलें. या निमित्तानें ८ ऑक्टोबर १९५० ला रविवारीं संध्याकाळीं ५ वाजतां डॉ. लागू यांच्या निवासस्थानीं ‘ नवभारता ’च्या लेखक-हितचिंकांचें एक अनौपचारिक संमेलन भरविण्यांत आलें. संमेलनाच्या निमंत्रणपत्रिकेंत म्हटल्याप्रमाणें ‘ नवभारता ’चा दर्जा कमी न होतां त्याची उपयुक्तता कशी वाढेल, त्याचा प्रसार अधिक होऊन त्याची आर्थिक परिस्थिति कशी सुधारेल, या गोष्टींवर विचारविनिमय व्हावा हाहि या संमेलनाचा एक हेतु होता.—संमेलनास सुमारें ६५–७० मंडळी उपस्थित होती. ज्यांच्या अध्यक्षेतखालीं १९४७ च्या ऑक्टोबरमध्यें ‘ नवभारता ’चें प्रथम प्रकाशन झालें ते महर्षि अण्णासाहेब कर्वेहि उपस्थित होते.

निमंत्रितांपैकीं जे संमेलनाला येऊं शकले नाहींत अशा सुमारें ३५ जणांनीं संमेलनाला व ‘ नवभारता ’ला पत्रद्वारें सुयश चिंतिलें होतें. त्यांपैकीं कांहींनीं आपल्या ज्या कांहीं सूचना लिहून कळविल्या होत्या त्यांचा आशय संमेलनाला निवेदन केला. अशा सूचनांचे स्थूलमानानें दोन गट पडतात. कांहीं सूचना अशा प्रकारच्या होत्या कीं, ‘ नवभारत ’ आहे यापेक्षां अधिक उपयुक्त झाल्यास त्याचा प्रसार वाढून त्याची आर्थिक परिस्थिति सुधारेल. दुसऱ्या प्रकारच्या सूचना अशा होत्या कीं, ‘ नवभारता ’चें सध्यांचें स्वरूप इष्ट व योग्य असेंच असून, हें मासिक आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होणार नाहीं, हें समजूनच तें कसें चालवावयाचें याचा विचार व्हावा. या दोन्हींहि प्रकारच्या सूचनांचा सारांश संमेलनापुढें वाचून दाखविण्यांत आला व तदनुरोधानें संमेलनांत कांहीं भाषणेंहि झालीं. संमेलनाच्या या प्रस्तुत प्रतिवृत्तांत त्या लेखी सूचनांचा सारांश खालीं दिला आहे. त्यावरून ‘ नवभारता ’संबंधीं त्या विचारवंतांचीं मतें वाचकांस कळून येतील. शिवाय संमेलनांत ज्या कांहीं वक्त्यांचीं भाषणें झालीं त्यांची पार्श्वभूमि समजण्यासहि त्यांचा उपयोग होईल.

“ वाचकाची रसिकता अधिक सखोल झाल्याशिवाय आणि त्याला ज्ञानविज्ञानाची खरी भूक लागल्याशिवाय आपल्याकडे त्यांना खेंचून आणणें गंभीर मासिकांना शक्य नाहीं. गांभीर्य आणि लालित्य यांचा सुंदर समन्वय असल्यास आजची परिस्थिति बदलूं शकेल. ”—वि. स. खांडेकर. “ ‘ नवभारता ’-चा दर्जा इतका उच्च आहे कीं, तो सर्वसाधारण सुशिक्षितांच्या डोक्यावरून जातो. दर्जा राखून भाषा सोपी करण्याचा प्रयत्न न झाल्यास खप वाढणार नाहीं. ”—माधवराव बागल. “नवभारतांत नीतिविषयक लेख अधिकाधिक यावेत ”—बाळुभाई मेहता. “ आपला वाचकवर्ग कोणता, त्याला काय हवें, काय नको, याविषयींचें नियोजन स्पष्ट चुकलेलें दिसतें. अनुवादाचा अनुवाद, बिंबाचें प्रतिबिंब, त्याची पुनः पडछाया असा प्रकार ‘नवभारतां’तून दिसून येतो. ”—श्री. रा. टिकेकर “ आज कोणताहि सांस्कृतिक उपक्रम आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होईल असें मला वाटत नाहीं. त्यांतहि गांधीवादी सांस्कृतिक धोरण महाराष्ट्रांत तरी यशस्वी होईल अशी जवळपास आशा दिसत नाहीं...या धोरणाला मुरड घालून कदाचित् तें स्वावलंबी होऊं शकेल. पण त्याला वेगवेगळीं मतें असणारे व आपल्या धोरणानें मधूनमधून लिहिणारे वेगवेगळे संपादक चालणार नाहींत. एकच विद्वान्, खंबीर, लेखनपटु व ठाम एकमत ठणठणीत मांडणारा संपादक असावा लागेल. महाराष्ट्रांत चुरचुरीत

## नवव्या वर्षांत पदार्पण केल्यावर

राजकीय टिप्पणी दर महिन्याच्या घडामोडींवर आल्याखेरीज वाचकांच्या अपेक्षा पूर्ण होणार नाहींत. मासिक अधिक उपयुक्त करावयाला त्यांत नवनवोन्मेषशाली उपसंपादक पाहिजेत, कीं जे नवीं नवीं अंगें वाचकांपुढें आणून त्यांची चटक लावतील. हे संपादक त्या त्या विषयांतील कार्यकर्ते असले तर एक प्रकारचें संघटनहि त्यांतून निर्माण होऊं शकेल. "—त्र्यं. शं. शेजवलकर. " इतिहास माणसापेक्षां विचारांची दखल घेतअसतो म्हणून 'नवभारता'च्या कार्याचें महत्त्व आहे. "—बा. रं. सुंठणकर. " 'नवभारता'कडून संस्कृतिसंवर्धन उत्तम रीतीनें होत आहे. कितीहि झीज सोसावी लागली तरी हें सांस्कृतिक कार्य चालू ठेवावें "—कुवलयानन्द. " पक्षातीत दृष्टीचा विश्वास जनतेंत जितका उत्पन्न होण्यासारखें धोरण दिसेल तितकीं मासिकें अधिक उपयुक्त होतील "—वा. ल. चिपळूणकर. " मासिक सांस्कृतिक कार्य उत्तम प्रकारें करीत आहे....अशा मासिकास ( शिक्षण-संस्थेप्रमाणें ) सरकारनें वार्षिक ग्रँट द्यावी "—य. र. आगाशे. " अशा प्रकारच्या उच्च पातळीवरून चालविलेल्या मासिकाची अत्यंत आवश्यकता आहे. अशीं मासिकें आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होत नाहींत. याचा एक अर्थ असा कीं मासिक विकत घेऊन उच्च विचार वाचणें वाचकांस परवडत नाहीं. किंवा ज्यांना परवडतें ते या बाबतींत उदासीन आहेत "—त्रिं. भि. कोलते. " ' नवभारत ' मराठी भाषेस भूषणावह आहे. पण अशीं मासिकें आर्थिक दृष्ट्या अपेशी झालीं नाहींत तरच नवल. "—भा. शं. भणगे.

" सध्यां देशांत चालू असलेल्या वैचारिक चळवळींचें हिरिरीनें मार्गदर्शन करणें, परंतु विशिष्ट वैचारिक पंथाचाच पुरस्कार न करणें, हाच एक मार्ग ' नवभारता 'ला मोकळा आहे. धार्मिक, तात्त्विक, व वैज्ञानिक विचारांना साहित्यिक ललित-लेखनात्मक स्वरूप तदर्थ दिलें पाहिजे. ज्या ज्या ठिकाणीं राजकीय व सांस्कृतिक चळवळींचे गट आहेत, त्या त्या ठिकाणीं त्या गटांना स्वतःच्या विचारसरणीचा मार्मिक किंवा मर्मभेदक ऊहापोह करणारें साधन म्हणून तें विवशपणें विकत घ्यावेसें वाटतें. "—लक्ष्मणशास्त्री जोशी. " नवभारतानें चालविलेल्या सांस्कृतिक कार्याचें मूल्य मध्यम वर्गीय जनतेला अधिक जाणवतें. तेव्हां या वर्गानें तें स्वावलंबी करण्याचा प्रयत्न केला पाहिजे माझ्या मतें खालील उपाय योजावेत. ' न. भा. ' साठीं देणग्या मिळवाव्यात. लेखकांना सध्यां मोबदला देऊं नये; पुढें ज्या प्रमाणांत ' न. भा. ' स्वावलंबी होईल त्या प्रमाणांत द्यावा. महाराष्ट्रांतील उद्योगधंदेवाल्यांना जाहिरातीच्या रूपानें ' नवभारता ' स साहाय्य करण्यास विनंति करावी. वरील उपाय अपुरे पडल्यास १ हजार ते ५ हजार पर्यंत मध्यम वर्गीय लोकांचीं नांवें नोंदवावीं, जे ' न. भा ' साठीं दर महिन्याला १ रु. हुकमी देणगी ( वर्गणी नव्हे ) देऊं शकतील." —के. ए. पोतदार. " गेल्या तिन्ही वर्षांतील सर्वच अंक आदर्श निघालेले आहेत. अशा प्रकारचें मासिक आम्ही सर्वांनीं जगविलें पाहिजे. कांहीं सूचना मला कराव्याशा वाटतात : मासिकाचा आजचा Royal size हा आकारच कायम ठेवावा. मात्र त्याचीं पानें कमी करून किरकोळ अंकाची किंमत ८ आणे व वार्षिक वर्गणी ५ रु. करावी. वर्गणी कमी केल्यास वर्गणीदारांच्या संख्येंत वाढ होऊं शकेल. वर्गणीदार वाढल्यास जाहिरातीहि मिळण्याचा संभव असतो. लेखकांच्या मोबदल्यांत थोड्या प्रमाणांत छाटाछाट केल्यास ' न. भा.'चे लेखक तक्रार करणार नाहींत याची मला खात्री वाटते. ' न. भा. 'चें स्वरूप Socio-politico-Economic प्राधान्येंकरून रहावें. तें सर्वसामान्य वाचकांच्या दृष्टीनें वाचनीय करण्यासाठीं त्यांत ललित मजकूर घालण्याच्या प्रथेला ' नवभारता 'नें बळी पडूं नये, असें मला प्रामाणिकपणें वाटतें." —बा. रा. ढवळे " केवळ जड विषयांना वाहिलेलें रूक्ष मासिक म्हणूनच पुष्कळांना तें नीरस वाटतें. कथा, काव्य आदि जीवनाचा आशय सौंदर्यपूर्ण रीतीनें व्यक्त करणाऱ्या प्रकारांना मानाचें व अवश्य स्थान त्यांत मिळण्याकडे लक्ष पुरविलें जावें. पुस्तकपरीक्षणें, संगीतपरिषदा वा जलसे यांचें रसग्रहण, चित्रकला, शिल्पकला, नृत्यकला आदि कलांबाबत होणाऱ्या प्रयत्नांची मार्मिक बूज यांसाठींहि सदरें हवींत.

विचारस्वातंत्र्यामुळें अंतिम मानवी हित साधलें जाण्याची शक्यता आहे यावर विश्वास ठेवून जें जें विचाराई तें तें प्रकट करण्याची शक्यता निर्माण करावी. त्यामुळें कदाचित् सर्वसाधारण समाजालाच नव्हे, तर अमुक चौकटींतच साहित्याचा आविष्कार होतो असें मानणाऱ्या कांहींना देखील बिचकण्याजोगें साहित्य प्रसिद्ध करण्याची तयारी हवी.''पु.आ.चित्रे.

सर्व उपस्थित मंडळींचें स्वागत करतांना श्री. अण्णासाहेब कर्वे यांच्या उपस्थितीचा गौरवपूर्वक उल्लेख करून श्री. शंकरराव देव म्हणाले: ''दर वर्षी 'न. भा.'च्या लेखकहितचिंतकांचें संमेलन भरवावें असें आमच्या मनांत होतें. पण हा योग आज तीन वर्षांनीं येत आहे. ज्या उद्देशानें 'नवभारत' सुरू करण्यांत आलें तो पुष्कळ अंशीं सफल झाला आहे असें, कांहीं अपवाद सोडून, पुष्कळांनीं मान्य केलें आहे. अर्थात् 'नवभारत' आहे त्यापेक्षां अधिक उपयुक्त व्हावें, त्याची प्रतिष्ठा अधिकाधिक वाढावी, हें आमचें यापुढचें उद्दिष्ट आहे. अशा प्रकारचीं मासिकें चालविण्याच्या बाबतींत वाढत्या प्रमाणांत मान्यता मिळत असली तरी त्यांची आर्थिक स्थिति मात्र सुधारत नाहीं, ही गोष्ट आतां सर्वांना विदितच आहे. 'लोकशिक्षण'कारांचा तोच अनुभव आहे. म्हणून नुकसान येत असलें तरी हा उपक्रम सोडण्याचें आमच्या मनांत नाहीं. आर्थिक परिस्थिति सुधारण्याबाबत अनेक हितचिंतकांकडून अनेक सूचना आल्या आहेत. त्यापैकीं कांहीं अशा आहेत कीं, लेखकांनीं आपल्या मोबदल्यांत कपात करावी. त्याबाबत आमचें धोरण स्पष्ट करावेसें वाटतें. वास्तविक पाहतां लेखकांना आम्हीं जितकें देऊं इच्छीत होतों तेवढें देऊं शकलों नाहीं याचेंच मला दुःख वाटतें. म्हणून लेखकांना अधिक त्याग करावयास लावणें इष्ट नाहीं. इतर श्रमांप्रमाणें लेखकांच्या श्रमालाहि योग्य तो मोबदला मिळाला पाहिजे, असें आमचें उद्दिष्ट आहे. म्हणून मासिकाला येणारी तूट भरून काढण्यास आपण इतर मार्गांचाच विचार केला पाहिजे—'नवभारता'-सारखीं इतर कांहीं मासिकें महाराष्ट्रांत नुकसान सोसून चालू आहेत. त्या सर्वांचें संयुक्तीकरण व्हावें अशी एक सूचना कांहीं मित्रांनीं केली आहे. तिलाहि आमचा पाठिंबा आहे.''

यानंतर आचार्य भागवतांनीं भाषण केलें. त्याचा आशय असा : ''कांहीं मंडळींची अजूनहि समजूत आहे कीं, हें मासिक गांधीवादी, कॉंग्रेसवादी किंवा विशिष्ट विचारांचाच प्रसार करणारें आहे. परंतु ही समजूत बरोबर नाहीं. हें मासिक कोठल्याहि संप्रदायाचें बनूं नये, या मासिकांतून भिन्नभिन्न सांस्कृतिक अभिव्यक्तीस वाट करून द्यावी, हाच या मासिकाचा आरंभापासून हेतु आहे. जीवनामध्यें संपन्नता वाढवावयाची असेल तर, ज्या ठिकाणीं देशांतील सर्व विचारवंतांना एकत्र येतां येईल अशीं या मासिकासारखीं व्यासपीठें बनलीं पाहिजेत अशी आमची श्रद्धा आहे. याचा अर्थ संप्रदायाच्या दृष्टीनें चालणाऱ्या सर्वच गोष्टी वाईट आहेत असा नव्हे. त्यांनाहि त्यांच्या परीनें विशिष्ट स्थान आहे—देशांतील घटनांसंबंधीं 'नवभारतां'तून एकहाती टिप्पणी ( Notes ) याव्यात अशा सूचना आल्या आहेत. परंतु 'नवभारता'चें जें आम्हीं असांप्रदायिक उद्दिष्ट म्हणून आमच्यापुढें ठेवलें आहे, त्या भूमिकेशीं केवळ एकाच जीवनदृष्टींतून सर्व घटनांचें परीक्षण होणें हें सुसंगत होणार नाहीं. अशा एकहाती टिप्पणींऐवजीं, त्या त्या पक्षांतील तज्ज्ञांकडून त्या त्या घटनांचें तटस्थपणानें वस्तुनिष्ठ रीतीनें समीक्षण करणारे लेख द्यावेत असें आम्हीं योजिलें आहे. अर्थात् अशा स्फुट लेखांतून लेखकानें प्रचाराच्या मोहाला बळी न पडतां विचाराच्याच मर्यादा सांभाळल्या पाहिजेत—'साहित्या'चे श्री. वा. रा. ढवळे, 'अभिरुची'चे श्री. चित्रे, 'सत्यकथे'चे श्री. भागवत व या सर्व नियतकालिकांमधून लिहिणारे श्री. दि. के. बेडेकर वगैरे लेखकमित्र यांच्याशीं बोलतांना असाहि एक विचाराचा सूर दिसून येतो कीं, अशा धर्तीचीं जीं निरनिराळीं मासिकें आहेत त्यांचें संयुक्तीकरण वा विलीनीकरण व्हावें. या बाबतींत विचार विनिमय करावयाला आमची तयारी आहे.—आपल्या प्रत्येकाभोंवतीं आपल्या मित्रांचा, हितचिंतकांचा, चहात्यांचा एक गट असतो. या गटांतून जर आपण बोलत राहिलां, तर 'नवभारता'ला थोडीफार आर्थिक मदत होऊं शकेल. आपला संबंध येणारीं

ग्रंथालयें, शाळा, संस्था व व्यक्ती यांच्यामधून 'नवभारत'ला वर्गणीदार मिळविण्याची खटपट झाली पाहिजे.--'नवभारता'सारखे सांस्कृतिक उपक्रम संपूर्णपणें स्वावलंबी होणें कठिण. म्हणून तो चालविण्याकरितां २-३ लाखांचा निधि जमविला पाहिजे.''

यानंतर उपस्थितांपैकीं कांहीं सद्गृहस्थांचीं भाषणें झालीं. 'सह्याद्री'चे अनुभवी संपादक श्री. दि. वि. काळे आपले मासिकविषयक अनुभव थोडक्यांत सांगतांना म्हणाले. ''कांहीं विशिष्ट पातळीखालीं उतरावयाचें नाहीं, परंतु फार उच्च कल्पनांना मुरड घालावयाचें ठरवून तात्यासाहेब केळकरांनीं 'सह्याद्रि' काढला. पहिल्या वर्षीं ७।८ हजारांचा खप झाला पण पुढें तो उतरत गेला.—लेखकांचें वार्षिक संमेलन भरविण्याचा उपक्रमहि तात्यासाहेबांनीं केला. प्राध्यापक वगैरे विद्वान् मंडळींजवळ सहकार्य मागितलें. त्या त्या विषयाचीं प्रत्येकीं १५० रु. चीं पुस्तकें पुरविण्याचे व दर लेखामागें २५ ते ५० रु. देण्याची त्यांनीं तयारी ठेविली; परंतु 'सह्याद्री'च्या दृष्टीनें त्यांतून विशेष असें कांहीं निष्पन्न होऊं शकलें नाहीं—इतर कांहीं नियतकालिकविषयक उपक्रमांना 'सह्याद्री'त स्थान देण्याची तयारी दर्शवून त्यांना सहकार्य देण्याचीहि विनंति केली. परंतु तीहि सफळ होऊं शकली नाहीं.'' श्री. दि. के. बेडेकर यांनीं आपल्या भाषणांत कांहीं मासिकांचें संयुक्तीकरण करावें ही कल्पना मांडली : ''एकीकरणाचा प्रश्न मर्यादित असून तो 'नवभारत', 'सत्यकथा', 'साहित्य', 'अभिरुचि', (बंद झाल्यासारखाच) 'नवा महाराष्ट्र' अशा नियतकालिकांपुढें आहे. या सर्व नियतकालिकांचे संचालक, संपादक, लेखक व वाचक आज आपापल्या वैशिष्ट्यांची व ध्येयवादाची प्रयत्नानें जोपासना करीत असतांना त्यांच्यापुढें आर्थिक व इतर अडचणी गंभीर स्वरूपांत उभ्या आहेत. या चारपांच मासिकांनीं आपल्या सर्व शक्तींचें एकीकरण करून जगण्याची हिंमत ठेवणें व ती व्यवहार्य करून दाखविणें शक्य आहे; एवढेंच नव्हे तर त्यांना तसें करावयाला प्रेरित करणें महाराष्ट्रांतील भावी सांस्कृतिक विचारप्रगतीच्या दृष्टीनें आपलें सर्वांचें कर्तव्यच ठरेल. अर्थात् व्यक्तित्वाची खची करून सांचेबंद व झांपडबंद वृत्तीची जोपासना करणारें एकीकरण आपणांस नको आहे! या एकीकरणामुळें 'व्यक्तित्वा'ला मर्यादा पडणार नाहींत, उलट आजचा प्रत्येकाचा एकाकी असहायपणा जाईल व त्यामुळें सर्वांचेंच सामर्थ्य व उपकारकत्व वाढीला लागेल, अशा दृढ श्रद्धेनेंच आपण सर्वांनीं एकीकरणाची योजना आंखून पार पाडली पाहिजे. या चारपांच मासिकांचे लेखक, वाचक व जाहिरातदार या सर्वांचें बौद्धिक व आर्थिक सामर्थ्य जमेस धरलें व संपादनकार्यांतली एकीकृत शक्ति लक्षांत घेतली तर एकीकरणानंतर कला व साहित्य यांसाठीं एक व समाजशास्त्रीय (व इतर शास्त्रीय) विचारांसाठीं दुसरें—अशीं दोन मासिकें राहून तीं यशस्वी होतील. म्हणून सहकार्य, वर्गीकरण व व्यक्तित्वाच्या श्रेयाची कदर ह्या मूलभूत तत्त्वांच्या पायांवर एकीकरण यशस्वी करून दाखवावें अशी माझी सूचना आहे.'' श्री. प्रभाकर पाध्ये म्हणाले : ''एकत्रीकरणामुळें नवीन उदयोन्मुख लेखकांना वाव मिळणार नाहीं. नवीन लेखक तयार करणें हें मासिकाचें एक कर्तव्य आहे. मासिकानें आपापलें कार्यक्षेत्र ठरवून, आपल्या मर्यादा ओळखल्या पाहिजेत. समाजशास्त्रीय क्षेत्र 'नवभारता'नें निवडलें असून त्या दृष्टीनें 'नवभारत' यशस्वी झालें आहे. लालित्याकरितां 'नवभारता'नें फार तर एक-दोन गोष्टी द्याव्यां. त्यांपैकीं एक इतर भाषेंतील उत्कृष्ट लघुकथेवरून अनुवादित असावी. शास्त्रीय लेख नेहमीं सोपे करून देतां येतील असें नाहीं—'न. भा.'नें 'संयुक्त महाराष्ट्र' या पुस्तकावर पूर्वीं दिले होते त्याप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर वा महत्त्वाच्या पुस्तकांवर 'परिसंवाद' (Debates किंवा Symposium) अनेक दृष्टिकोनांतून लेखरूपानें द्यावेत—'न. भा.'ला निरनिराळ्या संस्थांकडून देणग्या मिळणें आवश्यक व इष्ट आहे.'' श्री. र. के. खाडिलकर म्हणाले : ''एकीकरण यशस्वी होण्याचा संभव कमी आहे. कारण कोणत्याहि मासिकाची एक विशिष्ट प्रकृति असते. ती नष्ट करणें इष्ट नाहीं.—संपादकीय टिप्पणींऐवजीं त्या त्या पक्षाच्या तज्ज्ञांकडून लेख मागवावे अशी सूचना आली आहे. पण आज

अशी स्थिति आहे की ही सूचना व्यवहार्य होण्यासारखी नाहीं." एकीकरणाच्या कल्पनेचा पुरस्कार करून श्री. श्री. पु. भागवत म्हणाले : "आज आपल्या साधनशक्तींचें एकत्रीकरण करणें अत्यंत आवश्यक झालें आहे. उच्च अभिरुचीची नियतकालिकें चालविणें दिवसेंदिवस कठिण झालें आहे. संपादक लेखकांना मोबदला देऊं शकत नाहींत. जाहिरातदारहि अनेकांना जाहिराती देऊं शकत नाहींत. वर्गणीदारहि किती मासिकें घेऊं शकणार? म्हणून लेखक, संपादक, संचालक आणि वर्गणीदार यांनीं या गोष्टीचा गंभीरपणें विचार केला पाहिजे". श्री. विठ्ठलराव घाटे यांनीं एकत्रीकरणाला विरोध दर्शविला. ते म्हणाले : "ही एकीकरणाची सूचना भयंकर आहे. ती व्यक्तिमत्त्वाच्या व बुद्धिस्वातंत्र्याच्या आड येणारी आहे. ठिकठिकाणीं चुली निर्माण झाल्या पाहिजेत व प्रत्येक सुगरणीला वाव मिळाला पाहिजे.—'नवभारत' मुळींच सांप्रदायिक नाहीं.—लेखकांनीं आपल्या विषयांची मांडणी सोपी केली पाहिजे. अत्यंत गहन व सूक्ष्म विचार व भावना सोप्या करून सांगतां येतात." कवि बा. भ. बोरकर म्हणाले : "ज्या कारणांसाठीं तत्त्वनिष्ठ आणि सच्छील माणसांना आजच्या जगांत जगणें अशक्य झालें आहे, त्याच कारणांमुळें चांगलीं मासिकें चालणें कठिण झालें आहे. आज संयुक्त कुटुंबें मोडून जोडप्यांचे संसार होऊं लागले आहेत. अशा मनोवृत्तींत एकत्रीकरण जमेल असें वाटत नाहीं." प्रा. गं. बा. सरदार म्हणाले : "एकत्रीकरणानें व्यक्तिमत्त्वाचा विलोप होण्याचें कारण नाहीं. मुख्य प्रश्न आर्थिक असून तोच एकलीकरणानें सुटण्याचा जास्त संभव आहे—निरनिराळ्या पक्षांत काय ग्राह्य आहे हें वस्तुनिष्ठ तटस्थ भूमिकेवरून महाराष्ट्राला सांगणाऱ्या असांप्रदायिक शिक्षकांची व मासिकांची आज अत्यंत आवश्यकता आहे.—आज सर्वत्र वैफल्यभावना दिसत आहे याचें कारण आजचे लेखक कमी बुद्धिमान् आहेत असें नव्हे. तर, एकंदर आपल्यापुढील समस्याच पूर्वींपेक्षां अधिक गंभीर आहेत. सबंध जगच त्यामुळें भांबावून गेलें आहे." प्रा. ओतुरकर म्हणाले : "व्यवहाराच्या दृष्टीनें मासिकाचा विचार झाला पाहिजे. लेखकाला पानीं ५ रु. व संपादकाला २५०–४०० रु. महिना मिळाले पाहिजेत." श्री. बा. मु. लिमये म्हणाले : "पूर्वीं लेखकांची त्यागाची परंपरा होती. तिचें संवर्धन कसें होईल याचा आपण विचार केला पाहिजे..." श्री. के. नारायण काळे म्हणाले : "कोणाचेंहि व्यक्तित्व न मारतां, सहकार्याच्या पायावर एकीकरण झाल्यास बाह्य खर्चाच्या बाबी (overhead charges) कमी करतां येतील. परस्परसहकार्यानें निरनिराळीं मासिकें निरनिराळ्या पातळीवरून चालवितां येतील व एकाचें नुकसान दुसऱ्यानें भरून काढतां येणें शक्य होईल."—शेवटीं आचार्य जावडेकर यांनीं समारोपाचें भाषण केलें. ते म्हणाले : "'नवभारता' सारखे आतांपर्यंत उच्च पातळीवरून झालेले प्रयत्न नुकसानीचेच झाले आहेत, हें आपण जितकें मोकळेपणानें मान्य करूं तितकें आपणांस लोकांचें सहकार्य व मदत मिळणें शक्य होईल.—जगतात ते लायख व मरतात ते नालायख ही कसोटी आतां बदलूं लागली आहे. सज्जनांना योग्य वातावरण निर्माण करण्यासाठींच सज्जन मरतात. म्हणून आम्हीं जगण्यासाठीं आमचें विचारवैशिष्ट्य सोडणार नाहीं व तसें कोणींहि सोडूं नये. विचारांची मक्तेदारी 'मनॉपली' कोणींहि घेऊं नये. दुसऱ्याचें व्यक्तिमत्त्व व वैशिष्ट्य नष्ट न करतां तें अबाधित व संवर्धित ठेवूनच एकीकरण वा विलीनीकरण साधतें का तें पहावयाचें आहे. पूर्वीं सहकार्याचे प्रयत्न अयशस्वी झाले. म्हणून ते आजहि अयशस्वी होतील असें नाहीं. उच्च पातळीवर जितके सर्व संप्रदाय एकत्र येऊं शकतात तितके खालच्या पातळीवर उतरल्यावर एकत्र येणार नाहींत—वेगवेगळ्या पक्षांतील व पक्षाबाहेरील लोकांनीं निरनिराळ्या घटनांसंबंधीं लिहिणें विचारस्वातंत्र्याच्या दृष्टीनें अवश्य आहे. पक्षातीत विचारकांना आज वाढती मागणी आहे व त्या मागणीप्रमाणें पुरवठाहि होत जाईल. स्वतःला पक्षातीत म्हणवून घेणारे आज पुष्कळ लोक आहेत...." शेवटीं आ. जावडेकरांनीं सर्वांचे आभार मानल्यावर संमेलनाचें काम संपलें.

Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका